हातचा [1]दुना जरी वनफलांचा आणि कशाबशा अन्नाचा असतो तरी तो ज्याला मिळतो तो आपल्याला भाग्यवान् समजतो. व सर्व लोक त्याजवर, त्याच्या भरभराटीच्या काळांत जसें त्याच्या संबंधानें सादर प्रेम ठेवावें तसें सादर प्रेम अशा आपत्कालींही निष्कपटपणानें आणि निरिच्छबुद्धीनें ठेवीत आहेत.' हेराच्या तोंडून ही हकीकत ऐकून अकबराला मोठें आश्चर्य वाटलें. शिवाय, प्रतापसिंगाचे प्रशंसनीय गुण ऐकून अकबराचे दरबारांतील लोकांसही विलक्षण चमत्कार वाटला व ते त्याची उघडपणें तारीफ करूं लागले. इतकेंच नव्हे; तर त्या काळीं दिल्लीचा पहिला प्रधान जो खानखानन ह्मणून होता तो प्रसिद्ध कवि असून, त्यानें प्रतापसिंगाचे गुण ऐकून त्याला एक तहनियतनामा (प्रशंसापत्र) लिहून पाठविला. या पत्रांतील कित्येक पद्यें जशींच्या तशींच मेवाडच्या भाटांनीं आपल्या ऐतिहासिक काव्यांत उतरून घेतलेलीं आहेत. खानखानन यानें त्या पत्रांत प्रथमतः प्रतापाच्या धीरगंभीरतेचें वर्णन करून पुढें असें लिहिलें होतें कीं, 'मनुष्याच्या जवळ संपत्ति व अधिकार असणें हा भाग जगतीय क्रमाप्रमाणेंच नश्वर आहे; परंतु मनुष्याचे सद्गुणाची आणि सत्कृतीची प्रशंसा जगांत फार दिवस राहते. तेव्हां, [2]पुत्तो! तुझी धन्य आहे. कीं, तूं अशा संकटावस्थेंतही बादशाहास शरण येत नाहींस आणि आपली कीर्ति व अब्रू राखण्याकरितां उचित असे प्रयत्न करितो आहेस. हे गुण हिंदू राजांमध्यें असाधारण आहेत व येणेंकरून तूं आपल्या जातीचा अभिमान विलक्षण रीतीनें रक्षीत आहेस. तूं राज्यवैभव आणि सुखप्राप्ति हीं कस्पटाप्रमाणें लेखून आपल्या पूज्य कुलाचें नांव अजरामर करीत आहेस!'

प्रतापसिंगावरील कालचक्राची गति अजून विरुद्ध दिशेकडेच होती. त्याला जेवायला देखील अवसर व निवांतपणा सांपडत नसे. अनेक वेळ तर असें झालें होतें कीं, भोजनाचें ताट वाढलेलें पुढें आलें असतां, मोंगल आले असें ऐकून तो तें टाकून निघून जाई. त्याचे बरोबर त्याची बायको, सून, मुलगे वगैरे सर्व परिवार असून, जवळ खाण्याला नसल्यामुळें कधीं कधीं त्यांना निखालस फांके पडत! त्यांनीं रानगवताचें बीं आणि मोळ यांचें पीठ करून त्याच्या भाकरी कराव्या; त्या अर्ध्या खाव्या, अर्ध्या तशाच बांधून ध्याव्या; आणि इतक्यांत शत्रूंचें धरणें आलें कीं, रानांवनांतून

---

१. 'दुना' ह्मणजे, राजाचें भोजनपात्र वाढलें असतां त्यांतील पदार्थ राजा आपल्या प्रीतीच्या लोकांस थोडथोडा देतो तो. रजपूत राजांमध्यें 'दुना' देण्याची चाल पूर्वीपासून असून तो ज्यास मिळेल त्याचा राजानें मोठा मान केला असें लोक समजतात.

२. भाट व मुसलमानी ग्रंथकार प्रतापसिंगास 'पुत्तो' ह्मणत असत. याचप्रमाणें पृथ्वीराज चव्हाणाला 'राय पिठोरा' असें ह्मटलेलें आढळतें.

लपत फिरावें. याप्रमाणें त्यांना मोठ्या वनवासांत दिवस काढणें प्राप्त झालें. खा- याला जवळ कांहीं नसलें ह्मणजे सर्व मुलें त्याचे भोंवतीं जमून ओरडत व ती त्यांची दीनावस्था बघून त्याच्या पोटांत उमळून येई. तथापि तो तसाच धैर्यानें ती वेळ मारून नेई. असें विलक्षण धैर्य व असा अद्वितीय अभिमान फारच थोडा सांपडेल. एकदां त्याचे बायकोनें आणि सुनेनें मोळाचें पीठ करून त्याच्या भाकरी भाजल्या आणि सर्व मुलांस एकेक भाकरी देऊन सांगितलें कीं, 'अर्धी भाकर आतां खा आणि अर्धी संध्याकाळला ठेवा.' त्याप्रमाणें त्या मुलांनीं केलें. त्या वेळीं प्रतापसिंग आपल्यावर जें संकट आलें होतें त्याचा विचार करीत जवळच बसला होता. इतक्यांत, त्याचे मुलीनें, संध्याकाळच्या जेवणाकरितां जी भाकरी राखून ठेविली होती तीवर एका रानबोक्यानें उडी मारिली ह्मणून, मोठ्यानें किंकाळी फोडिली; आणि दुसरीं मुलेंही भुकेनें व्याकुळ होऊन ओरडत होतीं. ह्या वेळेपर्यंत प्रतापसिंगाचें धैर्य सुटलें नव्हतें. पण ह्या प्रसंगीं तर तो अगदीं गतधैर्य झाला. मोठमोठ्या महायुद्धांत समरांगणीं व भोंवतीं त्याचे पुत्र व आप्त मरून पडत तेव्हां देखील त्याच्या धैर्याला यत्किंचित् विकार झाला नाहीं. व त्या वेळीं तर तो अभिमानपुरस्सर असें ह्मणे कीं, 'येवढ्याकरितांच रजपुताचा जन्म आहे.' परंतु, ह्याप्रमाणें मुलांचा खाण्याकरितां आक्रोश ऐकिल्यावर मात्र त्याला अगदीं वेड्यासारखें होऊन गेलें. आणि तो आपल्याशीं ह्मणाला, 'नांव मात्र राजा आणि दुःखप्रसंग तर ह्या प्रकारचे आहेत. तेव्हां, राजपद धारण करून मीं असेंच दुःख भोगावें असें असेल, तर जळो तें नुस्तें नांव !' नंतर, शेवटीं त्यानें अकबराकडे एक मनुष्य पाठवून त्याशीं असें बोलणें लाविलें कीं, 'मला कांहीं फुरसद द्यावी; माझा ह्या समयीं कांहीं इलाज चालेनासा झाला आहे.'

प्रतापसिंगाची ही विनंति ऐकून अकबराला मोठा हर्ष झाला. व ह्याप्रमाणें शत्रु प्रतापसिंग हा वाटेवर येत चालला असें वाटून त्यास मोठा अभिमान उत्पन्न झाला. त्याणें लागलीच आपल्या दरबारी मंडळीची सभा भरवून त्यामध्यें तो विचार काढिला; व त्यानें, 'प्रतापाकडून असें विनंतीचें व नम्रतेचें पत्र आलें आहे' वगैरे सांगून, 'आतां तो लौकरच आपल्याला शरण येईल' अशी आशा दर्शविली. परंतु हा सर्व प्रकार, त्या सभेंत पृथ्वीराज राठोड ह्मणून एक दरबारी मनुष्य होता त्यास बिलकुल खरा वाटला नाहीं. हा पृथ्वीराज ह्मणजे, बिकानीरच्या राजाचा धाकटा भाऊ असून, तो मोठा शूर व बुद्धिमान् असा कवि होता. बिकानीर संस्थान मारवाडांत असून अगदीं सपाट जमिनीवर आहे. त्यांत डोंगर, पर्वत, वगैरे आश्रयार्ह अशा मजबूत जागा मुळींच नाहींत व त्यामुळेंच तेथील राठोडवंशीय

राजे जरी शूर होते तरी त्यांचा मोंगलांपुढें टिकाव न लागून, त्यांस शेवटीं अकबराला शरण जावें लागलें. बिकानीरचा ठाकूर (राजा) मालदेव हा असून त्याचा सेनाधिपति त्याचा धाकटा भाऊ वर सांगितलेला पृथ्वीराज हा होता. परंतु त्याचा पराजय होऊन तो अकबराला शरण गेल्यावर, तो अकबराच्या दरबारीमंडळीपैकींच एक झाला असून त्याचा मित्रही बनला होता. त्याला, अकबरानें सांगितलेला प्रतापसिंगाविषयींचा प्रकार अगदीं खरा न वाटून तो ह्मणाला कीं, 'हें केवळ थोतांड किंवा बनाऊ कृत्य आहे. प्रतापसिंगाच्या कोणा शत्रूनें हें खोटें पत्र बादशाहाला पाठवून त्यास आशा उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु अशा प्रकारचें पत्र, प्रतापाला दिल्लीचें तख्त जरी मिळालें तरी तो कालत्रयीं पाठविणार नाहीं व तो तुह्मांला शरण येणार नाहीं अशी माझी पक्की खात्री आहे. येवढ्याकरितां मी आपल्या विश्वासाचा मनुष्य त्याजकडे पाठवून त्याजविषयीं काय तो शोध आणवितों; ह्मणजे सत्य प्रकार समजून मग काय करणें तें करावें.' अकबरानें तेव्हां त्याप्रमाणें करण्यास पृथ्वीराजाला परवानगी दिली आणि पृथ्वीराजानें एक कविताबद्ध पत्र लिहून आपल्या मनुष्याबरोबर प्रतापसिंगाकडे पाठविलें. या पत्रांत त्यानें जो मजकूर लिहिला तो शूर व पराक्रमी पुरुषांस अत्यंत प्रोत्साहक असा असून त्या मजकुरांचीं पद्यें अजून तिकडील लोकांत मोठ्या प्रेमानें गातात. त्या पद्यांचा भावार्थ खालीं दिला आहे. यांत जरी मूळच्याप्रमाणें खरा शौर्यप्रोत्साहक रस उतरला नसेल, तरी मूळांतला रस फारच प्रशंसनीय आहे. पृथ्वीराजानें पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर आपल्या कविताबद्ध पत्रांत लिहिला होता:—

"राणा प्रतापसिंगजी, आह्मां हिंदूंच्या सर्व आशा आपल्यासारख्या पराक्रमशाली हिंदुराजपदधाऱ्यांवरच अवलंबून आहेत. जरी कित्येकांकडून त्या आशांची निराशा झाली तरी प्रतापसिंग राण्यांकडूनही तशा प्रकारची निराशा होऊन, त्यांनीं अकबराला शरण यावें ही अत्यंत दुःखास्पद गोष्ट आहे. आह्मी तर दुर्दैवानें आपले पराक्रम सर्व हरलों आणि आमच्या बायकांचें पावित्र्य गेलें. आमची लज्जा आणि आमच्या बायकांचें पातिव्रत्य हीं सर्व आह्मीं अकबराला विकलीं व तीं त्यानें खरेदी केलीं. परंतु उदेसिंगपुत्र जे आपण त्या तुह्मीं मात्र ती रजपुतांची लाज आणि स्त्रियांचें पावित्र्य हीं आपल्या कुळांत रक्षण केलीं आहेत. तीं तशींच पुढें निर्बाधपणें रक्षण करा. राजा, काय सांगूं ? येथें जो 'नौरोजा'चा उरूस भरतो, त्यांत कोणत्या खऱ्या रजपुताचे बायकोची अब्रू राहिली आहे ? कोणाची नाहीं. तेव्हां, याचप्रमाणें चितोडच्या सुप्रसिद्ध आणि परमाभिमानी सिसोदिया कुळाचीही अब्रू येथील 'नौरोजा'चे जत्रेंत विकावयास आणूं नका, ही विनंति

आहे. तुह्मांला वाटत असेल कीं, आपण सर्व गमावून भिकारी झालों; परंतु असें समजूं नका. जें तुह्मीं गमावलें तें सर्व जणूं काय तुह्मीं राखून ठेविलें आहे असेंच समजा. निराशेनें आह्मां क्षत्रियकुलोद्भवांस अनेक अपमानजन्य दुःखें भोगावयास लाविलीं आहेत. परंतु तशा प्रकारचें अपमानजन्य दुःख व अपकीर्ति हम्मीरवंशीयांकडे आजपर्यंत आली नाहीं. त्यांनीं आपली अब्रू आणि आपला अभिमान एतावत्कालपर्यंत रक्षण केला, हें आपण ध्यानांत बाळगिलें पाहिजे. सर्व जगाची दृष्टि तुह्मांकडे आहे. लोकांना असें वाटत आहे कीं, जें काय शौर्य गाजावयाचें आणि हिंदूंच्या अब्रूचें रक्षण व्हावयाचें तें प्रतापसिंगाकडूनच होईल. तुमच्या कुळाची आणि राजवंशीयांची आजतागाईत बेइजत झाली नाहीं, ती यापुढेंही होऊं नये; असें आह्मी सर्वजण इच्छितों. तुमच्या साभिमानी आत्म्याची आणि तुमच्या जयशाली तरवारीची तुह्मांला पूर्ण मदत आहे. त्यांच्या मदतीनें तुह्मी क्षत्रियांचें ब्रीद राखा. हा मोंगल बादशाह जो आमची अब्रू आणि आमच्या स्त्रियांचें पावित्र्य लुटीत आहे किंवा खरेदी करीत आहे, हा कधीं तरी उच्चासनावरून खालीं येईलच. त्याचें हें उच्चासन आणि त्याची ही भरभराट नेहमीं ह्मणजे अशीच अखंड राहील असें कदापि नाहीं. माझी तर खात्री आहे कीं, हें सर्व यश संपादन झालें तर प्रतापशाली प्रतापसिंगाकडूनच होईल. आणि मग आमची रजपूत जाति जी भ्रष्टबीज झाली आहे ती तुमच्याकडे येऊन, तुह्मांकडून निष्कलंक व पवित्र असें क्षात्रबीज घेऊन आपल्या वैराण व ओसाड रजपूतक्षेत्रांत पेरील. राजे प्रतापसिंग महाराज, ह्याप्रमाणें आपली जाति पुनः सतेज होईल व म्लेंछांची कारकीर्द धूळ खात पडेल. दिल्लीच्या निर्लज्ज कारभारांत कांहीं अर्थ नाहीं, व बादशाहास शरणागत होण्याचें काही कारण नाहीं. तुमच्या अभिमानास व यशसंपादनास ईश्वर साह्य आहे."—इत्यादि.

पृथ्वीराज राठोडाचें हें उत्तेजनकारक पत्र प्रतापसिंगास पावल्याबरोबर त्याला दहाहजार मनुष्यांचें बळ आलें, आणि त्याचे पूर्वीचे बेत आणि विचार सर्व फिरून त्याच्या मनाला उत्साह वाटूं लागला. कारण, पृथ्वीराजानें लिहिलेल्या प्रत्येक गोष्टीचा तो मनामध्यें विचार करून बघूं लागला, तों त्याच्या लक्ष्यांत आलें कीं, आज आपल्या गतवैभव आणि हतवीर्य रजपूत जातीला माझ्याकडे दृष्टि दिल्याशिवाय दुसरा उन्नतीचा मार्ग राहिला नाहीं. तेव्हां, इतक्यांना निराश करणें हें सर्वस्वी अश्लाघ्य आहे.

वर पृथ्वीराज कवीच्या कविताबद्ध पत्रांत जें, "आमचा मान आणि अब्रू 'नौरोजा'च्या उरूसांत विकलीं गेलीं," असें लिहिलें आहे, त्या संबंधानें या स्थलीं

कांहीं खुलासा करणें इष्ट आहे. 'नौरोजा'ची जत्रा मेषसंक्रांतीवर चैत्रमासांत भरत असे. परंतु पृथ्वीराजानें ह्या जत्रेचें नांव लिहून त्यांत अब्रू व मान विकलीं जातात ह्मणून जें लिहिलें तें चुकून लिहिलें, असें मुसलमानी इतिहासलेखक जो प्रसिद्ध अबू फजिल त्याचे लेखावरून दिसतें. दिल्ली येथें अशी अब्रू व मान विकलीं किंवा लुटलीं जाणारी जत्रा अथवा उरूस वर्षांतून कितीएक वेळां भरत असे खरा. परंतु तो 'नौरोजा' चा उरूस नसून भिन्न होता. 'नौरोजा'चा उरूस चैत्रांत भरत असे, व त्याला हिंदूंच्या वर्षप्रतिपदेपासून प्रारंभ होत असे. तो नऊ रोज (दिवस) चाले ह्मणून त्यास 'नऊ रोज' किंवा 'नौरोज' असें एक विशेष नांव दिलेलें असे. परंतु, वरील अपमान करणारा व बेअब्रू देणारा तो 'नौरोजा'चा उरूस नव्हे. असें वरील मुसलमानी इतिहासलेखकाच्या ग्रंथावरून दिसतें. पृथ्वीराजानें यासंबंधानें 'नौरोजा'चेंच नांव लिहिलें, यांत तरी त्याणें अगदीं चूक केली असें नाहीं. कारण 'नौरोजा'चा आणि या अब्रूविक्रीच्या जत्रेचा अगदीं निकट संबंध आहे. 'नौरोजा'चा उरूस नऊ रोज चाले ह्मणून वर सांगितलेंच आहे; त्याच्या नवव्या दिवशीं व इतर महिन्यांतील प्रत्येक मुख्य सणाचे नवव्या दिवशीं, अकबराचे कारकीर्दींत 'खुषरोज' (आनंदाचा दिवस) ह्मणून एक जोडउरूस भरत असे. तेव्हां, पृथ्वीराजानें आपल्या पत्रांत 'खुषरोज' ल्याहावयाचें तें 'नौरोज' लिहिलें हा त्याचा हस्तदोष होय. अस्तु. या 'खुषरोज' नांवाच्या जत्रेंत सर्व जातीचे व हुद्याचे लोक येत असत; इतकेंच नव्हे, तर खुद्द बादशाहाची राणी व त्याचा सर्व जनानखाना आणि इतर दरबारी व सरदार लोकांच्या बायका मुली व सुना या जत्रेंत येत असत. इतर 'खुषरोजा'चे उरूसांत कित्येक प्रसंगीं बायकांना येण्याची परवानगी असे किंवा नसे. परंतु ज्या 'खुषरोजा'ला उद्देशून पृथ्वीराजानें वरील सर्व हकीकत प्रतापसिंगास कळविली, त्या 'खुषरोजा'चे जत्रेंत मुख्यत्वें सर्व जातीच्या व पदवीच्या स्त्रियाच असत. या स्त्रीमेळ्यांत ज्या व्यापारी व उदमी लोकांच्या बायका असत त्या नानाप्रकारचे जिन्नस विकावयास घेऊन येत, व ते जिन्नस बादशाहाचे जनानखान्यांतल्या व त्याचे पदरच्या रजपूत सरदारांचे राणीवशांतल्या खाशा बायका खरेदी करण्यास जात[१]. इतर पुरुषांस वगैरे या जत्रेंत

---

१. या उरूसांत राजकुलांतील स्त्रीपुरुषांनीं केलेले तऱ्हेतऱ्हेचे व कळाकुसरीचे जिन्नसही विकावयास मांडीत असत. व राजकुलांतील लोकांस संतुष्ट करण्याकरितां, जत्रेची मौज पाहण्यास येणारे लोक त्या जिनसांची किंमत अढीच्या दिढी देऊन ते जिन्नस विकत घेत. एशिया खंडांतील पूर्वदेशीय राजघराण्यांतील पुरुष अशा प्रकारचे जिन्नस पाजस करून त्यांचा व्यापार करीत असत ही गोष्ट अनेक इतिहासग्रंथांवरून खरी आहे अशीं दिसते. तरी त्यांची फारशी प्रसिद्धि

जाण्याचा प्रतिबंध असे. तरी, हा योषिज्जनसमाज बघण्यास व त्यांचे गोड संवाद ऐकण्यास अकबर बादशाह हा स्त्रीवेष घेऊन त्या जत्रेंत घुसून निष्प्रतिबंध फिरत असे. अबू फजिल हा अकबराच्या या गर्ह्य कृत्यास आपल्या इतिहासांत निराळेंच रूप देतो. तो ह्मणतो, 'असें करण्यांत अकबराचा असा हेतु होता कीं, स्त्रियांच्या मेळ्यांत शिरून, त्यांजमध्यें आपल्या राज्यकारभाराचे संबंधानें काय काय अनुकूल किंवा प्रतिकूल बोलणीं चालतात व त्या आपल्या बादशाहीला कसा काय मान देतात हें समजून घ्यावें.' मुसलमानी कारकीर्दीच्या संबंधानें सर्व प्रकारचा अभिमान बाळगणाऱ्या इतिहासलेखक अबू फजिलानें अकबराच्या वतीनें ह्याप्रमाणें येवढें लिहिलें खरें. परंतु जगाचें इतक्यानें कदापि समाधान होत नाहीं, व होणारही नाहीं. अकबरासारख्या बादशाहाला आपल्या कारकीर्दीविषयीं आणि बादशाहीविषयीं लोकमत कसें काय आहे याचा तपास व शोध लावण्यास, अशा प्रकारें स्त्रीवेष घेऊन, एकत्र झालेल्या स्त्रियांच्या मेळ्यांत जाऊनच काय तें एक साधन होतें, असें नाहीं. व अबू फजिल यानें जी अकबराची बाजू राखण्याचा प्रयत्न केला तोही सफल झाला नाहीं, हें खचित. ज्या उरूसाविषयीं वर शूर पृथ्वीराजानें इतकें निक्षून प्रतापसिंगाला लिहून कळविलें तो रजपुतांना अपमानकारक आणि बेअब्रूचा उरूस हाच होय.

---

नाहीं. औरंगजेब हा फार चांगला टोप्या करणारा असून, त्याने या 'नौरोजा'च्या आणि 'खुपरोजा'च्या उरूसांत तशा टोप्या विकून बराच नफा मिळवून ठेविला होता. व त्या पैशांनीच तो मेल्यावर त्याचें और्ध्वदेहिक वगैरे त्याच्या सांगण्याप्रमाणें केलें. महमूद खिलजी याने अशा जत्रेंत स्वत: केलेली पुस्तकें विकून त्याच्या उमरावांकडून व सरदारांकडून त्यांची किंमत त्याला पुष्कळ मिळाली होती. ह्याप्रमाणेंच एका फारसी कवीनें कविता करून विकल्या; त्यांचीही त्यास चांगली किंमत आली होती. ह्याप्रमाणें ज्याला जें वाटेल त्यानें तें करून या उरूसांत आणून मांडावें आणि त्याची जी किंमत येईल ती त्यानें आपल्या और्ध्वदेहिकाकडे लावावी असा नियम असे.

१. वरील प्रकारच्या नीच व आपस्वार्थी चाली प्राचीन काळापासून सर्व पृथ्वीवर निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या रूपानें असलेल्या दिसतात. वर सांगितलेल्या उरूस वगैरे भरविण्याच्या रीति हिंदुस्थानांत मूळ मोंगल लोकांनीं आणिल्या. त्या रीतींचा फैलाव तार्तरी मुलखांत फार असून तिकडे अशा संबंधांत राज्यकर्त्यांकडून स्त्रियांची अब्रू गेली तर लोक तो अपमान न समजतां राजाची ती कृपादृष्टि व आपल्या कुटुंबावरील राजाचें तें ममत्व होय, असें समजत. फ्रान्स व स्काटलंड या देशांतही पूर्वी तेथील राजांचा असा यथेच्छ कारभार चालत असे असें इतिहासावरून दिसतें. लोकांच्या तरुण स्त्रिया ह्मणजे तेथील राजांच्या उपभोग्य वस्तु व त्या त्यांस अप्रतिबंधपणें मिळत! त्याबद्दल कोणासच कमीपणा वाटत नसे. परंतु इतक्या दूर जाणें क-

वरील सर्व हकीकतीवरून 'खुषरोजा'ची जत्रा ह्मणजे काय असते हें समजेल. अकबरासारख्या प्रसिद्ध व लोकमान्य बादशाहानें सदरील प्रकारच्या निंद्य चालीरीति चालू कराव्या हें त्याला अत्यंत दोषावह होय यांत संशय नाहीं. आणि त्यां-

---

शाला ? प्रस्तुतकाळींच गोसांवीमहाराज आपल्या शिष्यवर्ग भार्यांच्या युवतिस्त्रिया ह्मणजे आपल्याच उपभोग्या असें समजून, त्यांचा निष्प्रतिबंध स्वीकार करीत आहेत व त्यांस त्याबद्दल, त्यांच्या चरणीं सर्वस्व अर्पण करून लीन झालेले त्यांचे भाविक भक्तजन खुशाल अनुमती देत आहेत ! हा या सुधारलेल्या एकोणिसाव्या शतकांत विलक्षण गाढांधकार नव्हे काय ? पूर्वी अनेक ठिकाणीं अशी चाल होती कीं, राजे, सरदार, जमेदार किंवा पाटील यांस लोकांनीं आपल्या पहिल्या मुली दिल्याच पाहिजेत. अधिकाराच्या जोरानें किंवा वर सांगितलेल्या व हल्लीं प्रचारांत असलेल्या गोसांवीमहाराजांच्या ढोंगाप्रमाणें परमार्थिक हेतूनें असे नाना ढंग गरीब व थापडवाईक लोकांमध्यें विनधोक चालतात. तार्तरी देशांत किंवा फ्रान्स व स्काटलंड देशांत, प्राचीनकाळीं जेव्हां लोकांच्या स्त्रियांचे संबंधानें राजा वाटेल तें करण्यास मुखत्यार होता, तेव्हांपासून अशी रीति चालत आली होती कीं, वडील मुलगा जो असेल तो औरस असें मुळींच समजत नसत व तो जिंदगीचा वारस ह्मणून मानीत नसत. इतकेंच नव्हे, तर वडील मुलास सर्वांत धाकटा वांटा मिळून सर्वांत धाकटा मुलगा असेल त्यास सर्वांत मोठा वांटा मिळे; व तोच बापाचे पश्चात् सर्व जिंदगीचा व मालमत्तेचा खरा वारस होई. याचें कारण उघडच आहे कीं, राजे वगैरे लोकांची दृष्टि अशा मनमोक्त व्यापारांत तरुणींवरच असावयाची व अशा त्या तारुण्यवनांतून प्रथम निघणारीं संततिरूप फळें ह्मणजे औरस नसावयाचींच असा सर्व लोकांचा ग्रह असे. आणि ह्मणून, वडील मुलांकडे जिंदगीचा व मालमत्तेचा वारसा ठेवीत नसत असें दिसतें. यावरून त्या काळीं वडील मुलगा होणें हे अत्यंत निर्लज्जतेचे आणि अपमानाचें मानीत असतील यांत संशय नाहीं ! वर सांगितलेल्या जत्रेंत व उरूसांत कधींच प्राप्त न होणाऱ्या स्त्रियांस एकवार स्पर्श झाला ह्मणजेच बादशाह धन्य मानीत. परंतु त्यांतही, ज्या अत्यंत सुंदरी व प्रेमपात्र अशा स्त्रिया सांपडतील त्यांचें सर्वस्वीं हरण करण्यास त्या वेळचे बादशाह चुकत नसत. मग त्या स्त्रियांच्या नवऱ्यांस त्यांजबद्दल द्रव्य देऊन ते त्यांना विकत घेत, किंवा द्रव्याला भुलून ते नवरे नच ऐकतील तर त्यांना प्रसंगीं कंठस्नानही घालून त्यांचा त्या स्त्रियांवरील वारसा ते बादशाह उडवून देत, ह्मणजे झालें. अकबराच्या वेळेस ह्या ज्या 'नौरोज' व 'खुषरोज' अशा नांवांच्या जत्रा असत त्या, पुढें त्याचा मुलगा सेलीम (जहानगीर) यानें 'मीनाबाजार' या नांवानें सुरू केल्या होत्या. या मीनाबाजारांतच वर सांगितल्याप्रमाणें, नूरजहान नांवाची एक खपसुरत स्त्री त्याणें हरण केली होती; व त्यास तिचा नवरा अनुकूल नव्हता ह्मणून त्याला सेलिमानें अखेरीस कंठस्नानही घालून त्याचा तिजवरील वारसा उडविला होता. ही गोष्ट इतिहासांत प्रसिद्ध आहे. अगदीं अलीकडे अलीकडेही आपल्या इकडे, जरी केवळ वरच्या प्रकारचेच नव्हते, तरी रूपांतरानें त्या मासल्याचेच स्त्रीहरणाचे वगैरे निर्लज्ज प्रकार शेवटचे बाजीराव पेशवे आणि मल्हारबा गायकवाड यांणीं आपल्या अमदानींत ढवळ्या दिवसां०करण्यास कमी केलें नाहीं ! हें सर्वश्रुत आहेच. तेव्हां, राजमद काय काय अनर्थ करील हें कोणीं सांगावें ?

तही, जे रजपूत शूर राजे केवळ दुर्भाग्यानें लढाईत पराभूत होऊन तदधीन झाले, त्यांच्या स्त्रियांची अब्रू आणि पावित्र्य हीं बिघडविण्यासारखीं अश्लाघ्य कृत्यें त्याणें करावीं, हा मोठा चमत्कार होय. बहुत रजपूत कुटुंबांची अकबरानें या जत्रांतून अब्रू घेतली व त्यांस भ्रष्ट केलें, याविषयीं तर बालाग्र संशय नाहीं; असें त्या वेळच्या हकीकतींचे ग्रंथ वाचले ह्मणजे समजेल. परंतु, अशाही आणीबाणीच्या प्रसंगीं वर सांगितलेला शूर व सुप्रसिद्ध कवि पृथ्वीराज राठोड याच्या बायकोनें एके वेळीं जी त्याची फजिती केली ती वाचिली ह्मणजे रजपूत स्त्रियांच्या पातिव्रत्यशीलतेची धन्य वाटते. पृथ्वीराजाची बायको ही सिसोदिया घराण्यांतील सूक्तावत शाखेच्या मूळपुरुषाची कन्या होती. एके प्रसंगीं अशाच 'खुषरोजा'चे जत्रेंत पृथ्वीराजाची वर सांगितलेली पत्नीही इतर राजस्त्रियांबरोबर व सरदारस्त्रियांबरोबर गेली होती. ती लावण्यवती असून तिच्याविषयीं अकबरास अभिलाषबुद्धि उत्पन्न झाली. अनेक रजपुतांच्या स्त्रिया व कन्या वारंवार मिळून मोंगलांच्या चवचाल विषयवासनेस अधिकारमदानें आजपर्यंत वाटेल तसें खाजें मिळत आल्यामुळें ती त्यांची विषयवासना तृप्त न होतां, दिवसानुदिवस वरील प्रकारच्या 'नौरोज' आणि 'खुषरोज'सारख्या सानुकूल व यथेच्छ कृत्यांनीं ती अप्रतिबद्ध होऊन वाढत चालली होती. आणि त्यांतही, आजपर्यंत सिसोदिया घराण्यांतली स्त्री आपल्या हाताला लागली नाहीं असें मोंगलांस वाटून त्या संबंधाची महत्वाकांक्षा सिद्धीस नेण्याचा कधीं प्रसंग येईल याची ते वाटच बघत होते. तों वर सांगितलेला योग अनायासेंच घडून आला. पृथ्वीराजाची बायको सर्व स्त्रियांबरोबर त्या जत्रेंत फिरून माघारी परतली, ही संधि बघून अकबरानें, तिला मुद्दाम एक अडचणीची वाट दाखवून तिकडून जावयाला सांगितलें. त्याप्रमाणें ती त्या रस्त्यानें जाऊं लागली. तों, तेथें स्त्रीवेषधारी अकबर उभा राहून त्यानें तिला आडविलें. त्याबरोबर तिनें तें सर्व कपट समजून, लागलीच कमरेची कट्यार काढून अकबराच्या छातीवर धरिली. अकबर वेषांतरांत अर्थात् निःशस्त्र असून, अशा चोरीच्या नीच कृत्यांत असल्यामुळें त्याच्या साह्यालाही कोणी त्या वेळीं नव्हतें; त्या आडरस्त्यांत तींच दोघें काय तीं होतीं. तिनें ती कट्यार त्याजवर अशा नेमानें धरिली कीं, आतां अकबर अंमळ इकडे तिकडे हालला तर ती त्याची छाती फोडूनच टाकील; व ओरडून कोणाला मदतीला हांक मारील तर त्या जत्रेंत पुरुष मनुष्य कोणीच नसून, उरूसास आलेल्या जनानखान्यांतील व इतर बायका घो घो जमून त्यांच्या दृष्टीस ही आपली फजिती पडेल; अशा पेंचांत सांपडून त्याला त्या वेळीं अगदीं गप्प राहणेंच भाग होतें. शेवटीं, तिनें त्याचेकडून, 'माझ्या किंवा माझ्यासारख्या इतर रजपुत स्त्रियांच्या वाटेस जाणार नाहीं व त्यांची अब्रू घेणार नाहीं,' अशी शपथ घेव-

विली, तेव्हां ती कट्यार बाजूला घेऊन त्याला जाऊं दिलें, व आपणही पवित्रपणानें बाहेर पडली. ह्याप्रमाणें अकबराची पण खात्रीच झाली. ही गोष्ट इतिहासांत सुप्रसिद्ध आहे. या संबंधानें रजपुतांची अशी समजूत आहे कीं, सिसोदिया वंशांतील स्त्रियांची पवित्रता राखण्यास मेवाडची उग्रस्वरूपिणी मातादेवी व्याघ्रारोहण करून व हातीं शस्त्र घेऊन त्यांच्या साह्यार्थ सिद्ध असते. वरील स्त्रियेसारख्या निष्कलंकपणानें मोंगल बादशाहाच्या हातून रजपूत स्त्रिया क्वचितच सुटल्या. पृथ्वीराज कवीचाच वडील भाऊ रायसिंग ह्मणून होता. त्याची बायकोही अशाच जत्रेच्या जागीं अकबरानें अडवून तिचें पातिव्रत्यसर्वस्व लुटिलें होतें. यामध्यें तिचें धैर्य कमी ह्मणा किंवा तिचा पातिव्रत्याभिमानच पंगु ह्मणा, तिच्यानें कांहीं तशा बाणीच्या प्रसंगांतून पार पडवलें नाहीं. अकबरानेंही तिच्या पातिव्रत्याचे बदला तिला सुवर्णमौक्तिकांचे दागिने व जडजवाहीर देऊन सन्मानानें वाटेस लाविली. व याप्रमाणेंच बहुश: सर्व स्त्रिया महादान घेऊन घरीं जात! रायसिंगाची बायको व पृथ्वीराजाची बायको ह्या जावा जावा जत्रेंतून आपापल्या घरीं गेल्यावर त्या भावांनीं एकमेकांस आपापल्या बायका सुखरूपपणें घरीं आल्याचें कळविलें. पहिल्यानें रायसिंगाकडून पृथ्वीराजाला निरोप कळला. तेव्हां पृथ्वीराजानें साभिमानपूर्वक त्याला असें लिहिले कीं, 'तुझी बायको तुझ्या घरीं सुखरूप पोहोंचली, आणि तीही तोरड्यांच्या व कमरपट्ट्याच्या घागऱ्या छुम् छुम् वाजवीत व सोन्याच्या आणि जडावाच्या इतर अलंकारांचे किणकिणाटानें सभोंवारचा प्रदेश नादित करीत सानंदानें स्वगृहीं प्राप्त झाली खरी; पण, बंधो! तुझ्या मिशा कोठें आहेत रे?[१]'

असु; आतां आपण अरवली डोंगरांकडे वळून तिकडे स्वदेशाभिमानी प्रतापसिंग काय करीत आहे तें पाहूं. पृथ्वीराजाच्या उत्तेजनपर पत्रानें तर त्याला प्रोत्साहन आलें. परंतु नुस्तें प्रोत्साहन येऊन काय करावयाचें होतें? जवळ पैशाचें आणि मनुष्यांचें बल असल्याशिवाय नुस्तें प्रोत्साहन काय कामाचें? तें बल नसल्यामुळें तो तर अगदीं जेरीस आला. तेव्हां त्यानें त्रासून असा निश्चय केला कीं, आतां कोठें तरी देशांतर करावें. व असा विचार करून, जे त्याचे जिवास जीव देणारे होते ते आणि बायका मुलें ह्यांस घेऊन तो तेथून निघाला. त्यानें, मेवाड प्रांत सोडून सिंधुनदीचे कांठीं जाण्याचें योजिलें. तो अरवली डोंगर उतरून जवळच एक रान होतें

१. रजपुतांत आणि इतर हिंदु लोकांत अब्रूदारपणाचें चिन्ह ह्मणजे 'वर मिशी असणें' असें समजतात. व ती अब्रू नसली ह्मणजे 'खालीं मिशी झाली' असें ह्मणतात. आणि मुळींच मिशा काढणें हें सुतकी चिन्ह आहे असें मानितात. त्याप्रमाणें वरील लेखांत पृथ्वीराज आपल्या भावाला ह्मणतो कीं, 'तुझ्या मिशा कोठें आहेत?' ह्मणजे, त्या खालीं झाल्या–तुझी अब्रू गेली, अथवा, त्या मुळींच उतरल्या–तुझी बायको मेल्यासारखी झाली! असा त्याचा अर्थ.

त्यांतून जाऊं लागला. तों त्याच्या मनांत असा विचार आला कीं, 'आपल्या पूर्वजांनीं जें राष्ट्र मिळविलें व ज्या भूमीवर माझें जन्म झालें, तो प्रदेश ह्याप्रमाणें मीं उदासीनपणें सोडून जाणें ही शरमेची गोष्ट आहे.' हें मनांत येऊन, त्यानें पुढें जाण्याचा बेत तहकूब करून तेथेंच कांहीं दिवस मुक्काम केला. तों कर्मधर्मसंयोगानें अशी गोष्ट घडली कीं, त्याचा एक भामासा ह्मणून प्रधान होता, त्याला आपल्या यजमानाची ही दुरवस्था समजून फार वाईट वाटलें. तो प्रतापसिंगाचा पिढीजादा चाकर होता. त्यानें आपल्या जवळचें सर्व द्रव्य प्रतापाचे हवालीं करून, याच्या योगानें आपल्यास जें योग्य दिसेल तें करावें, अशी त्याची विनंति केली. तें द्रव्य आणि प्रतापसिंगाचे जवळ जें कांहीं होतें तें मिळून २५००० मनुष्यांचा बारा वर्षेंपर्यंत निर्वाह होईल इतकी जमा झाली. तेव्हां प्रतापसिंगाला पुनः हुशारी येऊन त्यानें फौज जमविली. इकडे, अकबराकडचे लोक प्रतापसिंग हा भिऊन पळून जातो आहे असें समजून स्वस्थ होते, तों प्रतापसिंगानें एकाएकीं अकबराच्या शहाबाज नांवाच्या सरदारावर स्वारी करून त्यास व त्याच्या टोळींतील सर्वांस मारून टाकिलें. आणि त्या सपाट्यांतून जे पळून गेले त्यांसही धरून मारिलें. असें झालें तेव्हां अकबराकडचे लोक सावध होऊन तयारी होते आहे, इतक्यांत त्यानें कुमळमेर किल्ल्यावर जाऊन तो घेतला. त्या किल्ल्यावर अकबराचे वतीचा अबदुल्ला नांवाचा किल्लेदार होता त्यास व त्याचे लोकांस त्यानें ठार केलें. याप्रमाणें, एका मागून एक असे त्यानें बत्तीस किल्ले घेतले. या विजयांत मोंगलांचे संबंधानें क्षमा किंवा दया ह्मणून त्यानें मुळींच ठेविली नाहीं. शत्रूकडचे लोक सांपडले कीं, त्यांस कापून टाकण्याचा सपाटा चालविला. भाटांनीं याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "प्रतापसिंगानें, मेवाडच्या प्रदेशांत शत्रूचें जें जें कांहीं आढळलें तें तें सफा करून सर्व मेवाडभूमि मैदान करून सोडिली." ह्याप्रमाणें अल्पावकाशांत व फारशा लढाया वगैरे न करितां त्यानें बहुतकरून सर्व मेवाड प्रांत हस्तगत करून घेतला. चितोड, अजमीर, आणि मंडलगड हीं ठिकाणें मात्र हस्तगत झालीं नव्हतीं. इतक्यांत, ज्यानें हा सर्व संकटाचा आणि दुःखाचा प्रसंग आणून आपल्यास विपत्ति भोगावयास लाविलें त्या राजा मानसिंगाचा समाचार घ्यावा असा विचार करून, प्रतापसिंगानें आपले लोक, त्याची राजधानी अंभेर(जयपूर)नगर याजवर पाठवून, तेथील मालपुरा नांवाची बाजाराची मुख्य पेंठ सर्व लुटून आणिली.

त्यानें उदेपूरही काबीज केलें. परंतु त्याविषयीं विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. उदेपूर येथें रक्षणाचीं योग्य साधनें असतीं तर तें प्रतापसिंगानें मुळींच सोडिलें नसतें. वरील विजयाबरोबर त्यानें तेंही हाताखालीं घालून बहुतकरून आपलें गतवैभव

मिळविलें. प्रतापसिंगाच्या या प्रतापावरून, वर एके ठिकाणीं अकबराचा मुख्यप्रधान खानखानन, जो प्रतापसिंगाविषयीं पूज्यबुद्धि वागवीत असे ह्मणून सांगितलें आहे, तो तर त्याची फारच तारीफ करूं लागला.

ह्याप्रमाणें प्रतापसिंगाची दैवगति अनुकूल दिशेला लागून तो आपल्या जयश्रीनें मात्स्यान् पूर्ववत् शोभूं लागला. अकबरानेंही रजपुतांचें शौर्यपराक्रम बघून त्यांचें नांव घेण्याचें बहुशः सोडून दिलें. याचें दुसरें कारण असें झालें कीं, त्याचें राज्यही दिवसेंदिवस वाढत जाऊन हळूहळू तें त्याला अनावर होण्याच्या पंथांत होतें. तेव्हां त्यास होतील तितके शत्रु कमी करून आपला काळ लढाया व युद्धें यांचेमध्यें घालविण्यापेक्षां, ताब्यांत असलेल्या राज्यांत सुव्यवस्था करण्याकडे लक्ष्य लावणें अधिक इष्ट होतें. प्रतापाला आपलें स्वतःचें पूर्वार्जित राज्यपद आपल्या ताब्यांत अभिमानपूर्वक ठेवण्यापलीकडे कांहीं विशेष महत्वाकांक्षा नव्हती. त्याचें राज्य बहुतकरून त्याचे ताब्यांत आलें; परंतु चितोड अद्यापि त्याचेकडे आलें नव्हतें. तें घेण्याविषयींची त्याची आशा अजून अपूर्ण राहिली होती व त्याकरितां तो मनांत मनस्वी जळत होता. प्रतापसिंगाच्या पूर्वकृत्यांकडे आणि अभिमानांकडे बघितलें ह्मणजे चितोड घेण्याविषयींची त्याची उत्कंठा किती जोराची असेल याची कल्पना होण्यासारखी आहे. तो ह्मणे, 'ज्या चितोडाकरितां बाप्पा रावळापासून आजपर्यंत हजारों रजपूत लढून त्यांनीं तें आपल्या ताब्यांत ठेविलें; पृथ्वीराज चव्हाण याजबरोबर समरसिंग (सामरसी) मेल्यानंतर त्याचे पश्चात् रजपुतांच्या क्षात्रधर्माची परिसमाप्तिच होण्याच्या पंथांत आली होती ती सांवरून, चितोडाचें संरक्षण करण्यांत आलें; या कामांत लक्षावधि रजपूत समरांगणीं बळी पडून चितोडाकरितां त्यांनीं आपल्या रक्ताचीं शिंपणें केलीं; बाप्पाच्या पुढें ऊरसिंगाचे बारा मुलगे चितोडाकरितां एकामागून एक अर्पण झाले; ज्या चितोडाच्या समरदेवतेला देवला ठाकूर, जयमल्ल व पत्ता हेही अर्पण झाले; ज्या चितोडाकरितां तीन वेळ जोहार होऊन तेथील रजपूत स्त्रियांनीं आपल्या पतींस व मुलांस उत्तेजन देण्याकरितां आपल्या जीविताचा नाश करून घेतला; आणि हजारों आत्महत्या, वध आणि रक्तपात होऊन जी चितोडभूमि सर्वदा रजपूतराजवंशांची ऋणी आहे; त्या पूज्य व अभिमानाच्या चितोडनगराचा ताबा परकीय लोकांच्या स्वाधीन असावा ह्यापरतें तें लांछनावह मला दुसरें काय असावयाचें आहे ? उदेसिंगानें जो चितोडाहून पाय काढिला तो पुनः त्याला लागूं नये, मग सिसोदियावंशाचा अभिमान आणि पराक्रम तो काय ? त्या वंशांत मी जन्मलों, त्या मजकडूनही तें अत्यंत महत्वाचें काम होऊं नये, मग माझें प्रतापसिंग नांव तरी काय कामाचें ? ही मला मोठी शरमेची गोष्ट आहे !' अशा चिंतेंतच

त्याला दुखणें लागलें. मग तें इतकें वाढलें कीं, शत्रूच्या शस्त्रघायांस देखील त्यानें आजपर्यंत कधीं जुमानिलें नव्हतें व यापुढेंही जुमानिलें नसतें, इतका तो त्या दुखण्यानें खंगून गेला.

शिवाय, त्याला दुसरी एक अशी काळजी होती कीं, 'मीं आजपर्यंत ज्या अभिमानानें, डौलानें व ऐटीनें वागून दिवस काढिले व शत्रूंशीं वांकून राहून आपल्या कुलनामाचें रक्षण करण्यांतच जन्म घालविलें; त्याप्रमाणें माझ्यापुढें माझे मुलगे हें माझें कुलव्रत चालवितील कीं नाहीं ? व त्यांजकडून, ज्या कित्येक माझ्या आशा आणि महत्वाकांक्षा अद्यावधि अतृप्त राहिल्या आहेत त्या शेवटास जातील कीं अशाच पडून राहतील ?' अशा विवंचना त्याचे मनांत नेहमीं घोळून त्याचें दुखणें दिवसानुदिवस बळावत चाललें. त्यांतून तो वांचेल अशी कोणास आशा राहिली नाहीं. ह्या शूर-धीर-गंभीर-पुरुषाच्या या प्रायोपविष्ट अवस्थेचें भाटांनीं फारच उत्कृष्ट व हृदयद्रावक वर्णन केलें आहे. उदेपूरच्या इतिहासाचे प्रस्तुतच्या भागांतील हा अद्वितीय नायक प्रायोपवेशनीं पडला असून त्याचे भोंवतीं त्याचे परमविश्वासू, जिवास जीव देणारे आणि आशा व वैभव यांचे मुख्याधारस्तंभ असे त्याचे पुष्कळ सरदार-मित्र जमले होते. त्यांस त्यांच्या या स्वामीची ही देहावसानसमयींची दशा बघून बहुत शोक उत्पन्न झाला. परंतु तो सर्वांनीं दाबून राण्याला क्लेश व यातना उत्पन्न होऊं नयेत ह्मणून मोठ्या गंभीरतेनें सर्वजण राण्याकडे बघत स्वस्थ बसले होते. तरी राण्याच्या जीवास स्वास्थ्य आणि शांति नसून त्याच्या मनोवृत्ति जणूं काय उचंबळून येऊन, त्यानें पुनः दीनासारखें पडावें. असा प्रकार कांहीं वेळ चालला. तेव्हां साळुंब्याचा ठाकूर पुढें होऊन राण्यास ह्मणाला, 'महाराजांच्या जीवास कोणते क्लेश होतात ? शांततेनें प्राण कां जात नाहीं ?' त्यावर प्रतापसिंगानें ओढत ओढत अशा शब्दांनीं आपला हेतु त्यांस जाणविला. तो ह्मणाला, 'माझा हेतु इतकाच आहे कीं, माझा देश माझे पश्चात् परकीयांचे हातांत जाऊं नये. व या विषयींची माझी कोणीं खात्री केली तर माझा जीव सुखानें जाईल !' यावर तो कांहीं वेळ स्तब्ध होऊन पुनः अंमळसा सावध झाला; आणि मरणोन्मुखवृत्तीच्या शब्दांनीं त्यानें आपल्या सरदारांस आणखी ह्मटलें, 'या उदेपुरांत आपल्या ज्या झोंपड्या[1] आहेत त्यांचे मोठ-

1. ह्या झोंपड्या पेशोळा नांवाचे तलावाच्या कांठीं होत्या. हा तलाव हल्लीं भोंवतालीं मोठमोठ्या राजमंदिरांनीं परिवेष्टित असा दृष्टीस पडतो, व त्यावरूनच, अशा पडत्या काळीं देखील त्याची जी शोभा दिसते ती रजपुतांच्या चालत्या काळांत किती भरभराटीची आणि वैभवाची असेल याचें अनुमान सहज करितां येतें. प्रतापसिंगाची स्थिति अतिशय वाईट असतां, केवळ कुटुंबांतील माणसांना वाऱ्यापावसापासून रक्षिण्याकरितां त्यानें ह्या झोंपड्या उभारिल्या होत्या. व पुढें रा-

मोठे वाडे करून त्यांत विलाससुखें भोगीत तुह्मी स्वस्थ चैनीनें पडाल; दिल्लीपति बादशाहाचे चरणकमळीं आपलीं मस्तकें घांसून त्याचा प्रसाद ह्मणून मोठमोठ्या संपत्ति व अधिकार मिळवून निरभिमानपणें राहाल; आणि अशा प्रकारच्या ऐषआरामांतच मेवाडचें फारां दिवसांचें स्वातंत्र्य घालवून ज्या आपल्या पूर्वजांनीं आपलीं आयुष्यें त्याच्या अभिमानांत घालविलीं त्यांच्या नांवास कालिमा आणाल; तर असें करूं नका. त्यांचा अभिमान धरून त्यांचें नांव चिरकाल टिकेल असें करा.' यावर सर्वांनीं मोठ्या लीनतेनें व निश्चयपूर्वक त्याला सांगितलें कीं, 'जर आह्मी बाप्पा रावळाचे खरे वंशज असूं तर आपल्या इच्छेप्रमाणें चितोडगड घेतल्याशिवाय उदेपूरचीं झोंपडीं मोडून तेथें राजवाडे बांधणार नाहीं. व आपल्या हेतूप्रमाणें युवराजासह मेवाडचें वैभव व स्वातंत्र्य जें आपल्या हातें पुन: मिळालें आहे तें रक्षण करण्यास कदापि आळस करणार नाहीं.' त्यांच्या तोंडून हें वचन ऐकिल्याबरोबर त्या वीरशिरोमणीला समाधान वाटून त्यानें शांततेची व आनंदाची मुद्रा दाखविली; आणि सर्वांकडे एक वेळ बघून डोळे मिटले व प्राणत्याग केला. ह्याप्रमाणें, या प्रतापशाली प्रतापसिंगाचा वि० सं० १६५३ ह्मणजे इ० स० १५९७ या वर्षी काळ झाला.

प्रतापसिंग मेला हा मेवाडांतील प्रतापशाली सूर्यच अस्तंगत झाला असें लोकांस वाटूं लागलें. एकंदर सिसोदिया कुळामध्यें प्रतापसिंगाची कीर्ति फारच असून जोंपर्यंत तिकडे स्वदेशाभिमानाचें यत्किंचित् तरी बीजें असेल तोंपर्यंत त्याचें नांव नि-

---

ज्यवैभव मिळविल्यावर देखील मरेपर्यंत तो त्या झोंपड्यांतच राहत होता. एके दिवशीं प्रतापसिंगाचा पुत्र युवराज उमराव हा बाहेरून घरी आला असतां ह्या पर्णकुटींत लवून शिरण्याचें त्यास भान न राहून, तो ताठरपणानेंच झोंपडींत शिरला. तो त्या झोंपडीचा बांबू पुढें आला होता त्याला त्याचें पागोटे अडकून पडलें. त्यामुळें उमरावाला संताप येऊन त्यानें त्या झोंपड्या काढून तेथें चांगले वाडे बांधण्याविषयीं दुसरे दिवशीं ठरविण्याचा बापाजवळ घांट घातला. त्यावरून प्रतापसिंगानें अनुमान बांधिलें कीं, प्रसंग पडेल तसें वागण्याचें याला माहित नाहीं, व यामुळें हा आपले इष्ट हेतु कोणकोणते पूर्ण करावयाचे राहिले आहेत याजवर लक्ष्य न देतां अधिकाराच्या व राजसत्तेच्या डौलांत मोठमोठे विलासच भोगील. आणि या अनुमानावरच प्रतापसिंगानें पुढील उद्गार काढून युवराजाचा व आश्रितमंडळीचा विलासीपणा त्यांस जाणविला आहे. यावरून दूरदर्शी व सारासारविचारवान् असे राजपदधारी, अपौरुष विलासांविषयीं किती उदासीन असतात हें दिसेल. अशा खऱ्या पुरुषांना सत्कीर्तिवधूनें नेहमी माळ घातलेलीच आहे असें समजावें. त्यांना विलास आणि मृत्यु हीं कस्पटाप्रमाणें असून, देशाभिमान व कुलव्रत हींच काय तीं त्यांचीं स्मरणीय स्थानें आणि विलासचिन्हें होत असें ते मानितात !

१. प्रतापसिंगाच्या या एकंदर विजयवर्णनावरून राजस्थानचा इतिहास लिहिणारा कर्नल टॉड् हा तर असें ह्मणतो कीं, 'रजपुतांचें स्वदेशाभिमानाचें वारें मोठें कठिण आहे. तें वारें पुन: कधींही न येवो ! आणि जर कदाचित् तें वारें पुन: उद्भवणारच असेल तर निदान इंग्रजसरकार असेप-

घून लोक त्याच्या नांवाला आणि मूर्तीला पूज्य असें मानतील. प्रतापसिंगासारखें देशाभिमानाचें व कुलाभिमानाचें कडकडीत व्रत एकंदर राजस्थानच्या इतिहासांत थोड्यांमध्येंच सांपडेल. काय त्याचा धीर ! कोण त्याची गंभीरवृत्ति ! किती त्याची सहनशीलता ! कशी त्याची दूरदृष्टि व पोक्तपणा ! आणि किती स्तुत्य त्याची साभिमानिता ! त्या काळाकडे नजर दिली, आणि प्रतापसिंग ज्या शत्रूशीं लढत होता त्याचें ऐश्वर्य मनांत आणिलें म्हणजे प्रतापसिंगाची छाती आणि उमेद कांहीं अतर्क्य होतीं, असें मनांत आल्यावांचून राहणार नाहीं. मोंगलांचें येवढें विस्तीर्ण राज्य, व तसेंच त्यांचें बल, संपत्ति आणि दरारा हीं एखाद्या सार्वभौमसत्ताधीशाप्रमाणें जिकडे तिकडे गजबजून राहिली असतां, त्यांशीं झुंजण्यास हिंदुस्थानांतील एका लहानशा प्रांताचा राजा, व ज्याला मनुष्यबल आणि संपत्ति यांची विवंचना, इतक्या कमीपणाला आणि आपत्तींना न जुमानितां, दंड ठोकून अभिमानपुरस्सर रणभूमीमध्यें उभा राहणारा, असा हा प्रतापसिंग, अद्वितीय वीरशिरोमणि खरा. शत्रुपक्षाकडील सेनासमुद्राची आणि त्यांच्या कुबेरासारख्या संपत्तिमत्तेची त्यानें यत्किंचित्ही पर्वा किंवा भीति न बाळगितां त्यांस कित्येक वर्षें एकसारखें झुलवून शेवटीं जेरीस आणिलें; ही त्याची अपूर्व व अघटित कृति मेवाडांतील लोक अद्यापि स्मरून, एखाद्या ईश्वरीनामाप्रमाणें ते प्रसंगविशेषीं त्याच्या नांवाचा घोष करितात. मेवाडांत कोठेंही जा; तेथें प्रतापसिंगाच्या संबंधानें कोणत्याही स्थलाची कोणत्याही महत्कृत्याविषयीं प्रसिद्धि नाहीं, असें एकही ठिकाण आढळणार नाहीं. कोठें त्याचे जय झाल्याचीं ठिकाणें आहेत; कोठें पराजयाचीं स्थानें आहेत; कोठें लपून छपून राहिल्याचीं स्थलें आहेत; आणि कोठें लहान मोठ्या झटापटी झाल्याचीं दरीखोरीं आहेत. एकूण, जिकडे जिकडे जावें तिकडे तिकडे अरवली डोंगरांतून, प्रतापसिंगाच्या आयुःक्रमांतील एकंदर महत्कृत्यें प्रतिध्वनित होऊन तीं तीं स्थलें त्याचा इतिहास मूर्तिमंत पुढें उभा करीत आहेत ! यांतील हळदीघांट हें स्थल म्हणजे भारतीय महायुद्धांतलें कुरुक्षेत्रच होय. इतिहासांत या रणकंदनासारखे प्रसंग थोडेच असतील व तसेच ते नेहमीं थोडे असोत.

---

## भाग दहावा.

### उमराव.

उमराव राज्यारूढ होतो.—अकबराची कारकीर्द.—अकबराचा मृत्यु.—उमरावाचा राज्यकारभार.

---

येत तरी तें उद्भवण्याची घाई न होवो !' खरोखर, रजपुतांच्या येथपर्यंत वर्णिलेल्या स्वाभिमानितेवरून टॉड् साहेबास भीति वाटण्याला कारण होतें आहे खचित !

राज्यसुखामुळें त्याला बापाचे सांगण्याचा विसर पडतो.—साळुंब्र्याच्या ठाकुराचें कृत्य.—उमरावाला आवेश येतो व तो बादशाही फौजेचा पराजय करितो.—राणपूर येथें दुसरी भयंकर लढाई व तींत मोंगलांचा पराभव.—सुमाजीला जहानगिराकडून चितोडावर राज्याभिषेक.—सुमाजी चितोडावरील हक्क उमरावाचे स्वाधीन करितो; व त्याचा अंत.—पुढील विजय.—सूक्तावत वंशाची मूळची हकीकत.—जहानगीर आपला मुलगा पर्वेझ यास राण्यावर पाठवितो, परंतु त्याचा पराजय होतो.—मोहबतखानाचा पराजय.

प्रतापसिंगाला १७ मुलगे होते. त्यांत उमराव हा सर्वांहून वडील होता, तो त्याचे मागून गादीवर बसला. उमराव याला अमरसिंग असेंही ह्मटलेलें आढळतें. हा वयाच्या आठव्या वर्षापासूनच बापाबरोबर असल्यामुळें त्याला सर्व संकटांचा आणि प्रसंगांचा अनुभव होता. त्याला डोंगरी प्रांतांतून लढाया मारणें आणि सर्व प्रकारचीं संकटें व यातना भोगणें हीं त्याच्या अगदीं वहिवाटींतलीं झालीं होतीं. तो राज्यारूढ झाला तेव्हां चांगला थोर वयाचा आणि कर्ता सवरता असून, त्यालाही बरोबरीचे मुलगे त्याच्या पाठबळाला शस्त्रधारी होऊन सज्ज होते.

अकबराचें आणि मेवाडप्रांताचें फारच वितुष्ट असून ते एकमेकांचे कट्टे हाडवैरी झाले होते. प्रतापसिंग मेल्यावर अकबर आठ वर्षे जिवंत होता. परंतु अकबराच्या कारकीर्दीत मोंगलांचें राज्य फारच विस्तारून, त्यांची आवराआवर करण्यांतच त्याला मेवाड प्रांताच्या शत्रुत्वाचा विसर पडला. तेव्हां अर्थात् अकबर जिवंत असेपर्यंत तर उमरावास विश्रांतिच सांपडली. व उमरावालाही मुद्दाम उठून मोंगलांची खोडी करावीशी वाटली नाहीं. कारण, मेवाडची योद्धे मंडळी इतकी थकून गेली होती कीं, त्यांना इतक्यांतच पुन: कलह उत्पन्न करून लढाया देण्याची हौस नव्हती. व ह्मणून, आहे तितक्यांतच सध्यां तृप्त राहून स्वस्थ बसण्याचा त्यांनीं विचार केला. अकबरानें एकंदर अर्धशतकाच्या जवळ जवळ राज्य केलें व तितक्या कारकीर्दीत त्यानें शहाणपणाचीं आणि लोककल्याणाचीं कामें पुष्कळ केलीं, असें मुसलमानी इतिहासलेखक अबू फाजिल लिहितो. त्यावरून पाहिलें असतां, त्याला समकालीन अशा युरोपखंडांतील नांवाजलेल्या राज्यकर्त्यांच्या बरोबरीला बसण्यास तो पात्र आहे, असें दिसतें. त्या वेळीं फ्रान्सांत चौथा हेनरी, व इंग्लंडांत अनुक्रमें पांचवा चार्लेस् आणि इलिजाबेथ राणी हीं अकबराच्या कारकीर्दीत युरोपामध्यें नांवाजलेलीं राजरत्नें होतीं; व त्यांच्या बरोबरीनेंच इकडे हिंदुस्थानांत अकबराची कीर्ति होती. हेनरी किंवा इलिजाबेथ यांनीं आपल्याला जसे उत्तम मंत्री निवडून घेतले होते तसे अकबरानेंही आपल्या दरबारीं उत्तम प्रधान नेमिले होते. हिंदुस्थानांतील दिल्लीदरबारांत इंग्लंडच्या वतीनें कोणी[1]तरी वकील असावा अशी कल्पना निघून अकब-

1. इलिजाबेथ राणीनें सर थॅामस रो यास वकील नेमून त्याणें हिंदुस्थानांत यावें असें ठरलें

राच्या कारकीर्दींतच इलिजाबेथ राणीनें प्रथमतः वकीलात पाठविली. अकबराचे मुख्य प्रधान बैराम आणि अबू फजिल हे असून ते अनुक्रमें त्या वेळचे इंग्लंडांत असलेले राज्यकारस्थानी सली आणि बर्ले यांच्या बरोबरीचे बुद्धिमान् व युक्तिवान् होते. अकबराच्या दरबारांत जसा शहाणपणा आणि बुद्धिमत्ता वास करीत होती तशी दुर्दैवानें मेवाडच्या दरबारांत नव्हती. परंतु तिकडे अकबराला समकालीन असा प्रतापसिंग राणा झाल्यामुळें त्याच्या व अकबराच्या गुणांचें पुष्कळ सादृश्य मिळून त्या उभयतांचेंही हिंदु व मुसलमान कवींनीं फार चांगलें वर्णन केलें आहे. अकबर हा फार थोर व महात्मा असा बादशाह होता, असें त्याच्या पदरचे मुसलमान कवि व इतिहासलेखक लिहितात. व ह्याप्रमाणें त्याच्या एकंदर स्वभावाविषयीं व वर्त्तनाविषयीं ते लिहून पूर्ण करीत असतां इतकें मात्र ह्मणतात कीं, 'त्यानें जरी महाराजपदधाऱ्याच्या योग्यतेला कमीपणा आणण्यासारखीं कांहीं कृत्यें केलीं असलीं, तरी त्यानें साधारणतः चांगल्या मनुष्याला न साजणारीं अशीं कांहीं कामें केलीं नाहींत.' अकबराच्या गुणबाहुल्याकडे नजर दिली असतां त्याच्या दोषैकचित्याविषयीं इतिहासलेखकांनीं उपेक्षा केल्यास तें त्यांचें करणें दोषावह होईल असें सर्वथा वाटत नाहीं. त्याचे कारकीर्दीतील कित्येक अंदाधुंदी आणि मनसोक्त आचार हीं त्याच्या निर्मल कीर्तीस कलंक लाविल्यावांचून राहणार नाहींत; तथापि, जगतीय स्थितिरीतींकडे आणि मनुष्यांच्या अधिकारमदानें दुर्वह होणाऱ्या मनोविकारांकडे यत्किंचित् लक्ष्य देऊन बघितलें असतां अकबराला उदार मनाच्या इतिहासप्रिय वाचकांनीं क्षमा करूंच नये असें कांहीं नाहीं. अकबराची प्रशंसा त्याच्या मुसलमान कवींनीं आणि दरबारी इतिहासलेखकांनीं केली येवढ्यावरच आपल्याला विश्वसून राहतां येत नाहीं; तरी, तो एकंदर सर्व मोंगलबादशाहांत चांगला व कीर्तिमान् राज्यकर्ता होऊन गेला यांत संशय नाहीं. अकबराच्या बरोबरच प्रतापसिंगाचेंही वर्णन त्या वेळच्या कवींनीं केलें आहे; व तें शत्रूकडील मुसलमान कवींनीं आणि इतिहासलेखकांनीं केलें असल्यामुळें तर प्रतापसिंगाच्या कीर्तिमत्तेस विशेष महत्त्व येतें.

आपल्याला मोंगलकारकीर्दीतील इतिहासाचे संबंधानें केवळ मुसलमानी इतिहास-

---

होतें. परंतु काय झालें कोण जाणे; तो त्या राणीच्या कारकीर्दीत इकडे न येतां, जेम्स राजा इंग्लंडांत राज्यारूढ झाला तेव्हां त्याला हिंदुस्थानांत यावयाला सांपडलें. पण तो जेव्हां दिल्लीदरबारांत येऊन दाखल झाला तेव्हां रजपुतांचें शौर्यवीर्य सर्व लयास जाऊन ते मोंगल बादशाहीला शरणागत झाले होते. सर थॉमस रो दिल्लीच्या दरबारांत प्रविष्ट झाला तेव्हां तेथें कर्ण घेला नांवाचा एक रजपूत मोंगलाशीं तह करण्यास आला होता, त्याविषयीं त्या इंग्रज गृहस्थाची फार आदरप्रयुक्त बुद्धि झाल्याबद्दल त्याणें आपल्या लेखांत लिहून ठेविलें आहे.

लेखकांवरच अवलंबून राहावयास नको आहे; व ह्मणून, त्या इतिहासलेखकांनीं जे-वढें लिहिलें तेवढें सर्व सत्य आहे असें मानण्यास किंवा त्याशिवाय इतर कांहीं ज्यास्त हकीकत मिळावयाची नाहीं असें समजण्यास कारण नाहीं. त्या वेळची यथयावत् हकीकत बुंदीच्या राजानें आपल्या रोजनिशींत लिहून ठेवली आहे. ती वरील इ-तिहासलेखकांपेक्षां अधिक प्रमाणभूत धरिली पाहिजे. याचें कारण वेगळ्या रीतीनें सांगावयाला नकोच. निरपेक्षबुद्धीनें आणि निष्पक्षपातानें लिहिलेले लेख अधिक विश्वनीय असतात हें जर खरें असेल तर, अबू फजिलापेक्षां बुंदीच्या राजाची रोज-निशी या कामांत अधिक विश्वासपात्र आहे असें ह्मणावें लागतें. कारण अबू फ-जिल हा कसा झाला तरी अकबराचा आश्रित आणि त्याचा दरबारी प्रधान होता. तेव्हां त्याचेकडून इतिहासलेखनाचें काम तितक्याच मानानें पक्षपातविरहित झालें असेल असें मानण्यास हरकत नाहीं. तेव्हां, बुंदीच्या राजाचे रोजनिशीवरून बघि-तलें असतां अकबराचा मृत्यु फारच चमत्कारिक रीतीच्या अपघातानें झाला असें दिसतें. बुंदीच्या राजाची रोजनिशी ह्या कामांत व पुढील बादशाहांचे संबंधानें वि-शेष महत्वाची व आधारभूत धरिली आहे. त्या अर्थी ही हकीकत खोटी असें ह्म-णतां येत नाहीं. शिवाय, या रोजनिशींत मोंगलबादशाहांचे वर्तनक्रम इतक्या चोख रीतीनें लिहिले आहेत कीं, तसे मुसलमान इतिहासलेखकांकडून लिहिले जाण्याची आशाच नाहीं. असु. राजा मानसिंगाचा आणि अकबराचा कोणता संबंध होता हें वाचकांस माहित आहेच. व राजा मानसिंगाचे अकबरावर किती उपकार अ-सून त्यानें त्याविषयीं किती ऋणी असावयाला पाहिजे होतें हेंही पूर्वभागांत सांगि-तलेल्या इतिहासावरून वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. अकबराला बादशाही पद मिळून त्याच्या अमदानीचा जो येवढा विस्तार झाला आणि त्याचा जो येवढा बोज वाढला याचें अर्धें श्रेय त्याचा मामा वरील राजा मानसिंग याजकडे होतें, असें पूर्वी एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. परंतु पुढें, एका गोष्टीचे संशयावरून मानसिंग हा अकबराचे मनांतून अगदीं उतरून, शेवटीं, त्याचा घात झालेला बरा, असें अकबराला वाटूं लागलें. ती गोष्ट ही कीं, मानसिंगाचा विचार, अकबराचे मागून त्याचा दुसरा भाऊ खुसरू यास दिल्लीचे तख्तावर बसवावें, असा असल्याविष-यींची गुणगुण अकबराला कळली होती. अकबराच्या मनात रीतीप्रमाणें आपला मुलगा सेलिम यानेंच आपले पश्चात् बादशाह व्हावें असें असून, त्याप्रमाणें त्यानें सर्व व्य-वस्थाही केली असती. परंतु तशी व्यवस्था उघडपणें करून मानसिंगाच्या मतावि-रुद्ध जाणें त्याला श्रेयस्कर नव्हतें. कारण, तो बलवान् व वजनदार असल्यामुळें त्याचे संमतीशिवाय अकबराचें कोणतेंही करणें सफल होण्याची आशा नव्हती. ह्मणून, त्यानें

असल्या उतार वयांतही राजा मानसिंगाचा घात करण्याची एक भयंकर युक्ति योजिली. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, त्याच्या त्या भयंकर युक्तीची मसलत उलट त्याचेच अंगावर येऊन त्यांत त्याचा नाश झाला. त्यानें, मानसिंगाला माजूम फार आवडत असे ह्मणून ती तयार करवून, त्यांत कांहीं जालीम विष घालविलें व त्या माजुमीचें ताट त्याचेकडे पाठविलें. परंतु मध्यें अशी चूकभूल झाली कीं, विष घातलेली माजूम त्याचे महालांत राहून चांगल्या माजुमीचेंच ताट मानसिंगाकडे गेलें. पुढें, अकबरानें आपली चांगली माजूम ह्मणून खाल्ली; तों तींतील विषानें तावडतोब त्याजवर आपला परिणाम केला, व त्याप्रमाणें त्या विषारी माजुमीनें त्याचा अंत झाला. ह्याप्रमाणें ही दिल्लीदरबारची हकीकत झाली.

आतां आपण मेवाडाकडे वळूं. उमराव यानें आपले राज्याचा बंदोबस्त करण्याचा क्रम चालवून, जमिनीचा वसूल वगैरे करण्याचे संबंधानें निरनिराळीं खातीं काढिलीं. त्याचप्रमाणें आपल्या पदरच्या सरदारांस व वीरांस जहागिरी व इनामें देऊन त्यांनीं गादीची कोणकोणती चाकरी करावी याविषयीं ठराव केले; व त्यांचे मान, पान, मरातब व पदव्या यांच्या पायऱ्या लावून त्यासंबंधानें कांहीं नियम केले. इतकेंच नव्हे; तर आपल्या दरबारी मंडळीनें पागोटीं[१] कोणत्या प्रकारचीं घालावीं याविषयींही त्यानें नियम करून ते सर्व नियम ठिकठिकाणीं मोठमोठ्या दगडी खांबांवर खोदवून सर्व लोकांस कळण्याकरितां प्रसिद्ध केले. अशा प्रकारचे खोदलेल्या ठरावांचे खांब अजूनही त्या प्रांतांत दृष्टीस पडतात.

ह्याप्रमाणें तो शांतिसुखानें व व्यवस्थेनें राज्यसुख भोगूं लागला. परंतु त्यावरून, प्रतापसिंगानें जें पूर्वी भाकीत केलें होतें कीं, अशा राज्यसुखाच्या नादांत गुंग होऊन इष्ट हेतु तसेच पडून राहतील, तें भविष्य सत्य होण्याचा रंग दिसूं लागला. उमरावानें उदेपूर येथील तळ्याचे कांठीं एक लहानसें राजमंदिर[२] बांधिलें. तें अद्यापि कायम असून, मेवाडच्या राजपुरुषांनीं त्याचे मागून जे मोठमोठे दगडी महाल बांधिले व ज्यांत ते अजूनपर्यंत राहतात, त्यांच्या बांधणीपेक्षां उमरावाच्या ह्या राजमंदिराची बांधणी अगदींच भिन्न आहे. ह्मणजे, त्या वेळच्या 'गॉथिक' शिल्पाप्रमाणें त्याची रचना आहे. अस्तु. तिकडे अकबराचे मागून जहानगीर (सेलिम) बादशाह हो-

१. 'उमरावशाही पगडी' ह्मणून एका प्रकारच्या रीतीनें बांधलेलें पागोटें उदेपूरचे राणे आणि त्यांची कांहीं दरबारी मंडळी राजदरबाराचे दिवशीं अजूनही घालतात. परंतु ही, असें पागोटें घालण्याची वहिवाट, फक्त त्यांच्या रजपूत जातीच्या दरबारी मंडळीसच विशेषेंकरून पाळण्याची सक्ती आहे. इतरांस तितकी सक्ती नाहीं.

२. हें राजमंदिर 'उमराव महाल' या नांवानें प्रसिद्ध असून, त्यास उमरावाचे मार्गे 'दुराचाराचें गृह' असें ह्मणत असत, असें सांगतात.

ऊन त्यानें चार वर्षेपर्यंत करावयाचा तो सर्व राज्यसंबंधीं बंदोबस्त केला; आणि नंतर त्यानें, आपल्या विस्तृत राष्ट्रांत आपल्याला न मानणारा असा जो हा एकटा मेवाडचा राणा होता, त्याचा समाचार घेण्याकरितां आपली बादशाही फौज जमवून तिची मेवाडावर रवानगी करून दिली.

ह्या वेळच्या हिंदुस्थानांतील राजांची स्थिति अशी होती कीं, ज्यानें त्यानें मोंगल बादशाहीस नमून असून मोंगल आपले श्रेष्ठ व आपण त्यांचे मांडलिक असें समजावें; बादशाहाचें फरमान व सनदा घेऊन त्याचे हस्तक ह्मणून राज्य भोगावें; आणि निरुपद्रवी राहून बादशाहाचें हितचिंतन करावें. ह्याप्रमाणेंच आपणही करून स्वस्थ राज्योपभोग घ्यावा किंवा युद्धास उभें राहून शत्रूंवर जय मिळवावा, या दोन विचारगजांची उमरावाच्या मनोभूमीवर मोठी झुंज लागली. ही त्याची अशी स्थिति बघून, त्याच्या सरदारांनीं व मुख्य दरबारी लोकांनीं, त्याला, त्याचे परमपूज्य पित्याच्या व आपल्या बहुसन्मान्य कैलासवासी धन्याच्या प्रायोपविष्ट स्थितींतील अत्यंत महत्वाच्या भाषणाची स्मृति देऊन, प्रतापसिंगाच्या त्या महान् हेतूंची सार्थकता होण्याविषयींची तयारी करण्यास आग्रहपूर्वक सांगितलें. ते ह्मणाले, 'प्रतापसिंग महाराजांनीं मरतेवेळीं जें आपणास सांगितलें कीं, प्रथमत: परम दु:साध्य जें स्वातंत्र्य तें मिळवून, नंतर शांततेच्या प्रसंगीं अनुभवण्याचें जें साहजिक राज्यसुख त्याजकडे लक्ष्य द्या, हें वाक्य नेहमीं आपण मनांत वागविलें पाहिजे.'

उमरावाचा जो वर सांगितलेला 'उमराव महाल' होता, त्यांत त्यानें एक मोठा थोरला विलायती बिलोरी आरसा ठेविला असून त्याचप्रमाणें त्यामध्यें इतर मौजेचे व विलासांचे जिन्नस ठेविले होते. अशा रीतीनें, बापानें मरतेसमयीं जी इच्छा व हेतु प्रकट केला होता त्याचे विरुद्ध त्याचा क्रम असलेला उघड उघड दिसत असून, अशाप्रकारें त्याला शांतिसुखाची व विलासाची आवड लागली ह्मणजे इष्ट हेतु तसेच राहावयाचे, असें लोकांनीं अनुमानित करून ठेविलें. याकरितां, अशा विलासांपासून आणि चैनींपासून त्यास पराङ्मुख करून शौर्यपराक्रमाच्या कृत्यांस त्याला प्रवृत्त करण्याविषयीं काय योजना करावी याचे विचारांत त्याचे सरदार होते. तों, साळुंब्याचा ठाकूर उमरावाचे महालांत आला आणि त्यानें चोहोंकडे बघून राण्याच्या विलासाचे प्रकार पाहिले. ते त्याला सहन न होतां त्यानें एकदम त्या आयन्यावर दगड मारून, तो आरसा फोडून टाकिला; व राण्याजवळ जाऊन त्याचा हात धरून त्याला सिंहासनावरून खालीं ओढिलें. नंतर तो भोंवतालच्या सरदारांस ह्मणाला, 'सरदार लोक हो, बघतां काय ? घोड्यावर स्वार व्हा; आणि प्रतापसिंगाच्या या मुलाची जी लोकांमध्यें बदनामी होत आहे तिजपासून त्याचें रक्षण करा !' साळुंब्याच्या ठाकु-

राचें हें अचाट कृत्य पाहून आतां पुढें राणा काय करील याजबद्दल सर्वांना मोठी भीति पडली होती. व राण्यानेंही त्याप्रमाणें रागाची व तिरस्काराची मुद्रा करून ठाकुराकडे पाहिलें व त्याला हिसका देऊन त्याच्या हातांतून आपला हात सोडवून घेतला. परंतु ठाकुरानें कोठें त्याला दाद दिली ? राण्याचा राग व तिरस्कार बघून, त्यामुळें त्याजकडून आपली होणारी बेइजत मनांत न आणितां, केवळ आपला परम प्रिय मित्र व स्वामी जो मुमुक्षु प्रतापसिंग राणा, ज्याला आपली वाणी वचनबद्ध झाली होती, तिची सत्यता त्याचे पश्चात् मनोभावें करून लोकांच्या अनुभवास आणावयाची; मग याचे पायीं कांहींही होओ; असा त्याचा कृतसंकल्प होता. आणि या त्याच्या संकल्पदार्ढ्यामुळेंच त्याला, राण्याचा हात बेलाशक धरून एकदम त्यास त्याच्या सिंहासनावरून खालीं ओढण्याचें धैर्य आलें. नाहींतर कोठून आलें असतें ? राण्यानें तरी पहिल्यानें मात्र राग व तिरस्कार यांची मुद्रा दाखविली. परंतु असें करण्यांत ठाकुराचा स्वार्थ नसून, सर्व सरदारांचेंही त्याच्या त्या अहेतुक कृत्यास पूर्ण साह्य आहे असें पाहून, त्यानें पुढें रागाचा ज्यास्त कांहीं एक प्रकार न दाखवितां, ठाकुरानें त्याला ओढून वगैरे जो त्याचा अपमान केला, तो सर्व त्यानें शांतपणें सहन केला. सालुंब्र्याच्या ठाकुराचा सद्धेतु लक्ष्यांत आल्याबरोबर त्याची पूर्वीची सर्व मुद्रा पालटून तो अगदीं गरीब झाला. त्याचे डोळ्यांतून एकसारखे अश्रु वाहूं लागले आणि तसाच घोड्यावर बसून सर्व सरदारमंडळीसह तो राजमंदिराच्या बाहेर पडला. तो तसाच त्या आवेशांत आपलें सैन्य वगैरे घेऊन, हल्लीं जेथें जगन्नाथाचें देऊळ आहे तेथें येऊन पोहोंचला. येथें आल्यावर त्याणें आपले अश्रु पुसून पुढें लिहिल्याप्रमाणें आपले आवेशाचे उद्गार बाहेर काढिले. तो मिशांवर हात फिरवून ह्मणाला, 'मला याबद्दल कांहीं एक वाईट वाटत नसून माझी या संबंधानें बिलकूल नाखुषी नाहीं. ठाकूर साहेब, आपले मजवर हे महत् उपकार असून मला विलासोदधींतून व त्या संबंधानें मनोविकारधीवरांकडून अडकून पडलेल्या मोहजालांतून मुक्त करून या सत्कृत्यास मोठ्या धैर्यानें प्रवृत्त केलें, याबद्दल मी आपला फार आभारी आहें. आपली स्वारी चालूं द्या. आपल्या कैलासवासी प्रतापसिंग महाराजांच्या संबंधानें आपण आतां यत्किंचित्ही दुःख करूं नका. आपला बोध मला सर्वांशीं मानवला. आपली मसलत मला मान्य आहे.' ह्याप्रमाणें बोलून तो वीरसमाज जो तेथून निघाला तो त्याच पावलीं सर्व प्रकारच्या उत्साहानें आणि आवेशानें दिवेरावर जाऊन उतरला. तेथें, बादशाही दिवाण जो खानखानन त्याचा भाऊ अबदुल्ला हा बादशाही फौज घेऊन आला होता. त्या उभयतांची त्या ठिकाणीं मोठी लढाई होऊन तींत बादशाही फौजेचा अगदीं मोड झाला. ही लढाई वि० सं० १६६४ ह्मणजे इ० स० १६०८ या सालीं झाली.

या लढाईतील विशेष शौर्य आणि विशेष पराक्रम ह्मटला ह्मणजे उमरावाचा काणा ह्मणून एक चुलता होता त्याचा दृष्टीस पडला. व त्या लढाईच्या संबंधानें भाटांनीं जीं वर्णनें लिहिलीं आहेत त्यांजमध्यें त्याची फार प्रशंसा केली आहे. या काणाचे जे पुढें वंशज झाले त्यांस काणावत् असें ह्मणतात. या लढाईनंतर बादशाहानें राण्याशीं कांहीं मुदतीचा तह केला; पण तो तरी नेमल्या मुदतीपर्यंत त्यानें पाळिला नाहीं. कारण, वि० सं० १६६६ ह्मणजे इ० स० १६१० च्या फाल्गुनांत पुन: वरील अबदुल्ला[१]याचेच हाताखालीं बादशाही फौज येऊन उदेपूर प्रांतांतील जें राणपूर ह्मणून पवित्र स्थान आहे, तेथें, दिवेरापेक्षां फार भयंकर रक्तपाताची लढाई झाली. या लढाईतही राण्याचाच जय झाला. परंतु त्याच्या पक्षाचे चांगले चांगले व विख्यात असे लोक फार मेले. त्यांत देवगडचा ठाकूर दुधो संगावत, नारायणदास, सुरजमल्ल, यशकर्ण, सिसोदियांपैकीं सर्व मुख्य सरदार, भाणाचा मुलगा व सूक्तावतांचा मुख्य सरदार पूर्णमल्ल, हरिदास राठोड, साद्रीचा भोपट झाला, कहिरदास कच्छवाह, बेडला येथील केशवदास चव्हाण, मुकुंददास राठोड, आणि जयमल्ल याचे वंशांतील पुरुष, हे वीर मुख्य होते. या लढाईत इतके मोठमोठे शूर मरून शेवटीं जय मिळाल्यामुळें जो शोकांतच आनंद झाला तो फारच मोठा होता. या जयाची कीर्ति फार पसरून मेवाडचा पतनकाल सर्व नष्ट होत चालला असें मानण्यास लोकांना दम आला, व सर्व गोदवाड प्रांतात राण्याचें किरमिजी निशाण फडकूं लागलें.

ह्याप्रमाणें एका मागून एक असे दोन पराजय होऊन नाशही पुष्कळ झाला, हें पाहून जहानगीर हा अस्वस्थचित्त झाला; आणि याबद्दल काय उपाय करावा ह्मणून विचार करूं लागला. शेवटीं त्यानें अशी एक कल्पना काढिली कीं, ज्या अर्थी या रजपुतांचें येवढें भांडण चितोडाकरितांच आहे त्या अर्थी तेथें त्यांच्याचपैकीं कोणी नवा राणा आपल्या वतीनें नेमून त्याचे स्वाधीन चितोड प्रांत करावा ह्मणजे आपाप त्यांचा कज्जा मिटेल; आणि ते जे आज सर्व एकविचारानें उमरावाला साह्य आहेत ते आपाप चितोडाकरितां या नव्या राण्याचे पक्षाला मिळून उमराव एकटा पडेल; व तसें झालें ह्मणजे उमरावाचा सूड आपल्याला सहज घेतां येईल. ह्याप्रमाणें त्यानें

१. या लढाईची तारीख मुसलमानी इतिहासलेखक फेरिस्ता याचे ग्रंथांत चुकून भलतीच लागली आहे. फेरिस्ताच्या ग्रंथांतील पक्षपाताच्या आणि अभिमानाच्या गोष्टी या पूर्वीं अनेक ठिकाणीं सांगितल्या आहेत व येथेंही तेंच कळविणें इष्ट आहे की, वरील दोन व त्या पूर्वींच्या ज्या ज्या लढायांतून मुसलमानांचे पराभव झाले ह्मणून लिहिण्याचा प्रसंग आला त्याविषयीं तो इतकेंच लिहितो कीं, 'शेवटीं सेनापतीनें आपली फौज माघारी बोलावली त्यामुळें लढाई आटोपली!'

कल्पनेचेच मांडे खाऊन, त्याप्रमाणें संगराजित किंवा सुग्राजी ह्मणून जो एक प्रतापसिंगाचा भाऊ पूर्वी फितूर होऊन अकबरास मिळाला होता त्याला सजवून राणापद देण्याचें योजिलें. नंतर जहानगीर बादशाहानें स्वत: सुग्राजीच्या कमरेस तरवार बांधिली आणि त्याचेबरोबर मोठा इतमाम देऊन त्याला मोठ्या समारंभानें चितोड येथील मोडक्या राज्यावर आणून बसविलें. या वेळीं सुग्राजीच्या बरोबर चितोडापर्यंत जो मोंगलाकडील इतमाम आला होता त्याबरोबरच, इंग्लंडाहून दिल्लीदरबारांत एक चापलेन (उपाध्याय) वकील ह्मणून आला होता, तोही होता. त्या चापलेनानें त्या वेळचें चितोड वगैरेंचें जें वर्णन आपल्या प्रवासाचे इतिहासांत लिहिलें आहे, तें वाचण्यासारखें आहे.[१]

अस्तु; सुग्राजी याला हें नामधारी राणा पद मिळाल्यावर तो तेथें सात वर्षे होता. परंतु इतके दिवसपर्यंतचा त्याचा तेथील वास ह्मणजे अगदीं उदासीनतेंतच झाला. कारण, त्याला चितोडच्या गादीवर मोंगलांच्या वतीनें राज्याभिषेक होऊन तो राणा झाल्यावर, त्यास तेथील त्याच्या वीरपराक्रमी वंशपुरुषांचीं एकेक कृत्यें बघून मोठी शरम वाटावी. जिकडे तिकडे महायोद्ध्यांच्या समाधी, मोठाले जयस्तंभ, त्यांजवर तेथें घडलेल्या पराक्रमांचीं वर्णनें खोदलेलीं, आणि किल्ल्यावर जेथें तेथें अनेक स्मरणीय स्थानें, हीं बघून त्याला असें वाटावें कीं, माझ्या वडिलांनीं काय काय कीर्तिशौर्याचीं कामें केली; आणि मी पहा कसा कीं, दुस्मान मोंगल यांजकडे फितुर हो-

---

१. "चितोड हें फार प्राचीन काळच्या एका राज्याच्या राजधानीचें शहर असून तें एका उंच डोंगरावरच्या विस्तीर्ण सपाट भूमीवर इंग्रजी निदान दहा मैल (पांच कोश) चौरस चौरस वसलेलें आहे. ह्या हल्लीच्या काळांत तर तेथें सुमारें शंभर देवालयें आणि राजमंदिरें मोडकळीस येऊन पडलीं होतीं. सर्व शहर उदास आणि पडकें दिसत होतें. याशिवाय तेथें खोदीव दगडांचे सुंदर जयस्तंभ आणि हजारों दगडी वाडे यांची ठिकठिकाणीं पडापड झालेली होती. चितोडगडावर चढण्यास एकच उत्कृष्ट व मजबूत दगडी मार्ग पहाड तोडून केलेला असून शहरांत जाण्यास चार निरनिराळे भव्य व विशाळ दरवाजे केलेले होते. या शहरांत या वेळीं शेतकरी मात्र राहत असून इतर वन्यपशुपक्ष्यांनीं चितोडास वसती केली होती. अशी जरी त्यांची अगदीं पडकी स्थिति होती तरी त्यावरून तें शहर आपल्या भरभराटीच्या काळांत किती सुंदर आणि वैभवयुक्त असेल याची प्रेक्षकांना सहज कल्पना होण्यासारखी होती. हें शहर अकबर बादशाहाने तेथील राणा नांवाच्या जुन्या राजांपासून मोठ्या पराक्रमानें लढाया करून काबीज केलें होतें व तेथील राजांस तेथून काढून दिल्यामुळें ते चितोडासारख्याच शेजारच्या डोंगरी प्रदेशांत जाऊन राहिले होते. अकबराला चितोड हे मिळावयाचें नव्हे; परंतु त्यानें जो त्यास पहिल्यानें वेढा घातला त्यामुळें तेथें अन्नसामग्रीचा पुरवठा होण्यास तेथील राजांचा नाइलाज होऊन शेवटीं त्यांना तो किल्ला सोडून देणें भाग झाले" इत्यादि.

ऊन त्यांचा हस्तक ह्मणून पुनरपि या माझ्या पूर्वजांच्या परमपूज्य राज्यपदावर निर्लज्जपणें येऊन बसलों ! तेव्हां मला धिक्कार असो ! या विचारांनींच तो नेहमीं उदासीन असे. त्याला कधींही त्या राजपदानें यत्किंचित् सुख झालें नाहीं. शेवटीं त्यानें, त्या राज्याचा खरा वारस जो आपला पुतण्या राणा उमराव, यास बोलावून आणून त्याचे स्वाधीन चितोड केलें; आणि आपण कंधार नांवाचा एक पर्वती व चंबळा या दोन नद्यांच्या संगमावर रणथंबोराजवळ वेगळाच मजबूत किल्ला होता त्यावर जाऊन सुखानें राहिला. पुढें सुग्राजी हा एक वेळ बादशाहास भेटण्याकरितां ह्मणून दिल्लीस गेला, तेव्हां जहानगीर यार्णे त्याच्या अशा विश्वासघातकी कृत्याबद्दल दरबारांत त्याची फार फजिती केली. ती सुग्राजीच्यानें ऐकवेना ह्मणून त्यानें शेवटीं आपली कट्यार काढून बादशाहाचे समक्ष आपल्या पोटांत भोंसकून घेऊन, तेथेंच प्राणत्याग केला. ह्याप्रमाणें ह्या उभयपक्षीं अविश्वासपात्र झालेल्या पश्चात्तापी सुग्राजीचा अंत झाला.

उमरावाकडे त्याचे पूर्वजांच्या राजधानीचें शहर अनायासें आलें व त्याचा त्यानें आनंदानें स्वीकार केला. ही गोष्ट झाली खरी; परंतु पुढें त्याची सुव्यवस्था लावण्याचें एक मोठेंच संकट पडलें. कारण, चितोड शहर इतकें मोडकळीस आलें होतें कीं, त्याची दुरुस्ती करण्यास पुष्कळ पैसा खर्च केल्याशिवाय त्याला मजबुती येणार नव्हती. चितोडचा किल्ला सर्वच दुरुस्त करावयाला पाहिजे होता. आणि त्याशिवाय तर त्या राजधानीला दुसरें कोणतेंच बल नव्हतें. किल्ला दुरुस्त असल्यावर मग रजपूत लोक त्या डोंगरी प्रदेशांत शत्रूंना दाद देणारे नव्हते. परंतु त्या दुरुस्तीचें काम बरेंच खर्चाचें असल्यामुळें पुढें कसें करावें या विचारांत उमराव राणा पडला. नंतर त्यानें, चितोडाचे भोंवतालचा प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला असतां चितोडाचें सौरक्ष्य आपाप दृढ होईल, असा विचार करून सुमारें ऐशीं शहरें व चाळीस किल्ले इतका मेवाडांतला प्रदेश आणखी आपल्या ताब्यांत आणून, तेथील संस्थानिकांस आपले साह्यकर्ते सरदार केले. या गर्दीतच अंताल नांवाचा किल्ला काबीज

---

१. बादशाही कारकीर्दीच्या इतिहासांत मोहबतखान ह्मणून जो एक मनुष्य प्रसिद्ध होता तो सुग्राजीचा एक मुलगा असून तो बाटून मुसलमान झाला होता. हा जहानगीरच्या कारकीर्दीत मोठा साहसी ह्मणून प्रसिद्ध असून त्या गुणावरूनच तो जहानगीराचा मुलगा शहाजहान याचा परम मित्र झाला होता. मोहबतखान या रजपुताचा साहसीपणा, खुद्द जहानगीर यास त्याचा मुलगा शहाजहान याचे अनुमतानें कैद करण्यास विशेषेंकरून उपयोगीं पडला. ह्याप्रमाणें एकेक व्यक्ति असतात. बापाची एक तऱ्हा तर मुलाची ही दुसरीच तऱ्हा. मोहबतखान हा त्या वेळीं चांगला प्रसिद्ध शूर सरदार ह्मणून गाजला होता.

करण्याचे बाबतींत सूक्तावत आणि चोंडावत या दोन वंशांची शर्यत लागून त्यांत त्यांचें शौर्य फारच दिसलें. असें भाटांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे[१]. या शर्यतींत सूक्तावत शाखेंतील बहुतेक पुरुष आणि सालुंब्र्याच्या घराण्यापैकीं तीन पुरुष इतके बळी पडले. परंतु भाट ह्मणतात कीं, 'जावत्कालपर्यंत त्यांच्या शौर्याची कीर्ति आहे तावत्कालपर्यंत जणूं काय ते जिवंतच आहेत.' व ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. मनुष्याचे पश्चात् त्याची कीर्तिमत्ताच काय ती अवशिष्ट राहते. आणि येवढ्याकरितांच पहिल्यापासून ज्याचा त्याचा कीर्तिसंपादनाचा प्रयत्न चालू असतो. अस्तु; येथें प्रसंगानुसार सूक्तावत शाखेची माहिती सांगितल्यास ती व्यर्थ न होतां तिचा पुढील इतिहासाशीं संबंध असल्यामुळें ती उपयुक्त होईल ह्मणून ती येथें देतों:—

सूक्त किंवा सुकटा हा उदेसिंगाच्या एकंदर चोवीस पुत्रांपैकीं दुसरा पुत्र होता. तो जेव्हां पांच वर्षांचा होता तेव्हांच तो विलक्षण धाडसी आणि निर्भय स्वभावाचा होईल असें आढळून आलें होतें. तो प्रकार असा झाला कीं, एके दिवशीं शिकलगारानें राणा उदेसिंग याची एक तरवार पाणी पाजून आणिली व रीतीप्रमाणें त्या धारेची परीक्षा पिंजलेल्या कापसावर पाहावयाची होती. तेथें जवळच सूक्त हा मुलगा होता. त्यानें बापास विचारिलें, 'या तरवारीच्या धारेची परीक्षा मनुष्याच्या शरीरावर नाहीं का समजणार?' आणि असें ह्मणून, त्यानें लागलीच ती तरवार आपल्या चिमुकल्या व कोंवळ्या हातावर चालविली! त्याबरोबर त्याच्या हाताला जखम होऊन त्यांतून भळाभळा रक्त वाहूं लागून त्याचें खालीं बिछाइतीवर थारोळें झालें. तरी, त्या विलक्षण धाडसी मुलानें यत्किंचित्ही न घाबरतां शस्त्रवेदना झाल्याचेंही कांहींएक दुःख दाखविलें नाहीं. सूक्ताच्या या विलक्षण साहसी कृत्यावरून त्याच्या बापास त्याचे पुढील वर्तनासंबंधीं भीति पडली असावी, किंवा सूक्ताचे जन्मकाळींच जोश्यांनीं त्याच्या पत्रिकेवरून असें भविष्य वर्तविलें होतें कीं, याचें जातक मेवाडच्या राज्यास अपायकारक आहे, त्या भविष्याचें त्याला स्मरण झालें असावें, काय असेल तें असो; त्यानें त्याच वेळीं आपल्या सेवकांस आज्ञा केली कीं, 'याला नेऊन मारून टाका.' त्याप्रमाणें त्या सेवकांनीं त्याला मारण्याकरितां नेलें. परंतु तें वर्तमान सालुंब्र्याच्या ठाकुरास कळल्याबरोबर त्यानें त्या मारेकऱ्यांपासून त्याला सोडवून राण्याकडे नेलें; आणि राण्याला विनंति केली कीं, 'याला मी आपला मुलगा ह्मणून पाळण्यास फार खुषी आहें, त्यास परवानगी द्यावी. व हाच पुढें माझ्या चोंडावतवंशाचा मुख्य होईल.' सालुंब्र्याच्या ठाकुराचे वय बरेंच वृद्ध झालें असून

---

१. या संबंधाची हकीकत, मागें पृ० ३८–३९ येथें दिली आहे ती पहावी. त्यांत लिहिलेले सुकटावत तेच हे सुक्तावत होत.

त्याला औरस मुलगेही होते. परंतु त्यांत, शहाणा व त्याचे पश्चात् त्याचें राज्य चालविण्यासारखा हुशार मुलगा कोणीच नव्हता. ह्मणून सूक्तालाच विद्या वगैरे शिकवून, त्यास आपले मागून आपल्या गादीचा वारस करावा असें त्याचे मनांत होतें. परंतु पुढें, त्याचे मुलगे व हा दत्तक घेतलेला मुलगा यांजमध्यें पुढील वारशाचे संबंधानें अगोदरपासूनच भांडणें उत्पन्न झालीं.* ह्मणून साळुंब्रा ठाकुरानें सूक्ताला त्याचा भाऊ प्रतापसिंग याजकडे पाठविलें. तेव्हां सूक्त हा भावाजवळ कांहीं दिवस त्याचा दरबारी व मंत्री ह्मणून राहिला. पुढें एके दिवशीं ते दोघे बंधु शिकारीला गेले असतां तेथें कांहीं कारणावरून त्यांच्यामध्यें वाद उत्पन्न झाला व त्याचा शेवट द्वंद्वयुद्धानें करण्याचें त्यांनीं आपसांत ठरविलें. त्यांनीं एकमेकांनीं परस्परांला भाल्यांनीं मारण्यास प्रारंभ केला. तेव्हां असाच प्रकार कांहीं वेळ चालल्यास ठीक गति नाहीं असें पाहून, त्यांच्या बरोबर त्यांचा कुलोपाध्याय होता त्याणें त्या उभयतांस पुष्कळ सांगितलें व 'यःकश्चित् कारणाकरितां एकमेकांचा घात करण्याचें क्रूर काम करूं नका' ह्मणून त्यानें त्यांस पुष्कळ विनविलें. परंतु त्यांपैकीं त्याचें कोणीच ऐकेना. मग त्यानें आपली कट्यार काढून आपल्याच उरांत भोंसकून घेतली, आणि त्या यादवी करणाऱ्या दोघां भावांवर आपल्या हत्येचें पातक घालण्याकरितां त्यांच्यामध्यें मरून पडला. हा प्रकार बघून मात्र प्रतापसिंगानें आपला हात आंखडला. व त्याच वेळीं त्यानें सूक्ताला सांगितलें कीं, 'तूं आतां माझ्या राज्यांत राहूं नकोस. तुझें माझें पटणार नाहीं.' तें ऐकून सूक्तानेंही त्याच क्षणीं त्याला नमस्कार केला आणि मेवाड सोडून अकबराचे दरबारांत जाऊन दाखल झाला. तेथें अकबरानें त्याला आश्रय देऊन आपले पदरीं बाळगिलें. इकडे, प्रतापसिंगानें पुरोहिताच्या आत्महत्येचें पातक आपल्या माथीं घेऊन तच्छमनार्थ बहुत दानधर्म केला; व त्या कुलाभिष्टचिंतकाचें और्ध्वदेहिक मोठ्या थाटानें करून, ज्या अर्थी त्यानें स्वामीभक्तिदर्शनार्थ येवढें जीवावरचें काम केलें, त्या अर्थी त्याच्या पुत्रास वंशपरंपरेनें सालेरा हा गांव बक्षिस दिला. त्या इनामाचा भोगवटा त्या पुरोहिताचे वंशज अजून घेत आहेत; व जेथें त्या उपाध्यायानें त्या राजबंधुद्वयाचे द्वंद्वार्थ आपला प्राण अर्पण केला तेथें एक समाधीसारखा चबुथरा बांधिला आहे, तोही अद्यापि कायम आहे. अस्तु. पुढें, प्रतापसिंग मोठ्या संकटांत असतां ऐन बाणीच्या प्रसंगीं सूक्तानें येऊन त्याला साह्य केलें व तेव्हांपासून मेवाडच्या भाटांनीं त्याच्या नांवास मोठा मान देऊन जेथें तेथें त्याला 'खोरासान-मुलतानका अग्गल' या नांवानें वर्णिलें आहे, वगैरे हकीकत पूर्वी आलीच आहे. हा प्रसंग येईपर्यंत सूक्त व प्रतापसिंग यांणीं पुनः एकमेकांचीं तोंडेंही पाहिलीं नव्हतीं, इतका त्यांचा परस्परांविषयीं रोष होता.

सूक्त मेला तेव्हां त्यास १७ मुलगे होते. त्यांतून भाइन्सरोर येथील वारस पुत्र जो भानजी त्याशिवाय करून बाकीचे सर्व मुलगे त्याचे स्मशानयात्रेस गेले होते. ते आपल्या पित्याचा प्रेतसंस्कारविधि आटोपून वाड्यांत परत आले तों, वाड्याचे दरवाजे बंद असून त्यांवर आपल्याला आंत येऊं न देण्याकरितां पाहरा ठेविला आहे, असें त्यांस आढळलें. तेव्हां 'याचें'कारण काय ?' ह्मणून त्यांनीं भावाला विचारिलें. तों त्यानें त्यांस असें उत्तर दिलें कीं, 'माझ्या वारशाप्रमाणें माझ्या वांट्यास भाइन्सरोर येथील राज्य आलें आहे; तेव्हां यामध्यें तुमचा इतक्यांचा निर्वाह बिलकुल होणार नाहीं. याकरितां येथून तुह्मीं वाटेल तिकडे आपल्या दैवाच्या मागें लागून जावें.' हें त्याचें उत्तर ऐकून त्यावर त्यांणीं तक्रार किंवा वाद ह्मणून बिलकुल न करितां ते त्याला ह्मणाले, 'असें आहे तर मग आंतमध्यें आमचीं शस्त्रें व घोडे राहिले आहेत तेवढे तरी दे, ह्मणजे आमच्या निर्वाहाला आमचा स्वतंत्र मार्ग होईल.' त्याप्रमाणें त्यानें त्यांना त्यांचे घोडे व शस्त्रें दिलीं. नंतर त्यांनीं आपल्या सोळा भावांपैकीं अचलसिंग ह्मणून एक भाऊ होता त्याला आपला मुख्य करून ईडरचा मार्ग धरिला. या वेळीं या अचलसिंगाची बायको गरोदर होती. ते ईडराकडे जावयास निघाले; परंतु ते पाळोद या गांवापर्यंत पोंचतात तों अचलसिंगाचे गरोदर पत्नीस प्रसववेदना होऊं लागून तिच्या बाळंतपणाची वेळ अगदीं जवळ आली असें वाटल्यामुळें, त्यांस त्याच गांवीं मुक्काम करावा लागला. पण तेथें सोनीगडावंशापैकीं जो ठाकूर राजा होता त्यानें त्यांस आपल्या या गांवांत मुळींच उतरूं दिलें नाहीं. अचलसिंग वगैरेंनीं त्याची, त्या प्रसंगाकडे लक्ष्य देऊन आपणास आश्रय देण्याविषयीं विनंति केली; परंतु त्यानें ती मुळींच मान्य केली नाहीं. तेव्हां त्यांना, त्या गांवाबाहेर माताजनुवी नांवाच्या रजपुतांचे एका देवीचें एक जुनें पडकें देऊळ होतें तेथें राहून त्या गर्भवतीचें बाळंतपण उरकून घेणें प्राप्त झालें. पण, संकटें येऊं लागलीं ह्मणजे चोहोंकडून येत असतात. पहिल्यानें ती पूर्णमासांची गरोदर असतां तिला बाहेर पडण्याचा प्रसंग आला. पुढें मुक्कामाला जागा मिळेना, व त्याला अनेक हरकती आल्या. देऊळ मिळालें तेंही मोडकें व पडकें. तशांत तो पाऊसकाळ. हे राजकुलोत्पन्न प्रवासी जाऊन देवळांत टेंकतात तों पावसाच्या सरींवर सरी चालल्या. तेव्हां ते कोरडी जागा बघून व देवळाच्या एका कोंपऱ्यांत आपलें सामानसुमान लावून त्या गर्भार स्त्रियेच्या सूतिकागृहाची व्यवस्था करीत होते; इतक्यांत पावसाच्या धूमधडाक्यानें त्या पडक्या देवळाची वरच्या बाजूची एक मोठी दगडी तुळई सुटून खालीं कोसळायला झाली. थोडक्यांत चुकलें; नाहीं तर त्या गर्भवतीच्या अंगावर ती तुळई पडून तिच्या खालीं तिचा चुराडा झाला असता. तों, बाळो ह्मणून त्या भावांपैकीं

एक होता तो त्वरा करून त्या तुळईखालीं डोकें देऊन उभा राहिला व त्यानें त्या अपघातापासून त्या स्त्रियेला वांचविलें. पुढें मंडळीनें जलदी करून बाभळीचीं झाडें तोडलीं व त्यांच्या लांकडाचा एक धीरासा त्या कोसळणाऱ्या तुळवटास देऊन बाळोची सुटका केली. नंतर त्यांनीं, अशा धोक्याच्या ठिकाणीं राहून उपयोग नाहीं ह्मणून, तेवढ्यांत तोडलेल्या बाभळीच्या लांकडांची एक निर्वाहापुरती छपरी बांधिली व तींत त्या गर्भवतीस निर्धोकपणें ठेविलें. या पर्णकुटीमध्येंच ती बाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्याचें नांव आसा (आशा) असें ठेविलें. हाच पुढें अचलसिंग सूक्तावताचे विस्तीर्ण शाखेचा मूळपुरुष झाला.

वरील स्त्रियेची पुत्रप्रसूति त्या वनवासी बंधुवर्गास शुभशकुनावह वाटून ती त्यांना धारजिणी झाली. ती नवप्रसवा स्त्री प्रवासाला निघण्यासारखी सशक्त झाल्यावर ते सर्वजण पुन: ईडरास जावयाला निघाले. ते तेथें पोहोंचल्यावर तेथील ठाकुरानें त्यांना सन्मानपूर्वक भेटून त्यांचें फार उत्तमप्रकारें स्वागत केलें, व त्यांची सर्व हकीकत ऐकून घेऊन त्यांच्या निर्वाहाकरितां कांहीं जहागीर त्यांच्या नांवावर तोडून दिली. येथें ते कांहीं दिवस होते. पुढें एके दिवशीं, राण्याचा मुख्य प्रधान शत्रुंजाचे[1] यात्रेकरितां निघाला असतां त्याचा ईडर येथें मुक्काम झाला. तो तेथें तंबू डेरे वगैरे देऊन मुक्कामाला उतरला होता. तों अकस्मात् मोठें वादळ होऊन, ज्या तंबूंत त्या प्रधानाची बायको होती तोही उपडा झाला. तेव्हां ती त्याखालीं सांपडून मरावयाचीच; परंतु त्या वेळीं या नवीन गेलेल्या कित्येक भावांनीं मोठ्या शिताफीनें तो वादळाचा प्रसंग बघून, त्या यात्रिक मंडळीस आपले राहण्याचे जागीं नेऊन त्यांना आसऱ्याची जागा दिली. व ह्याप्रमाणेंच मोठ्या बाणीचे प्रसंगीं त्या प्रधानाचे बायकोस त्या पडक्या तंबूंतून बिनधोक सोडवून त्यांनीं आपल्या कुटुंबीय स्त्रियांप्रमाणें तिची बर्दास्त ठेविली. हे त्यांचे उपकार स्मरून व पुढें, ते आपल्या राण्याचे जवळचे संबंधी आहेत असें समजून, त्या प्रधानास त्यांचेविषयीं फारच पूज्यबुद्धि उत्पन्न झाली. त्यानें त्यांस, 'आपण उदेपुरास आलां असतां, आपल्या इतमामाप्रमाणें राण्याकडून आपली सर्व प्रकारची तजवीज करूं,' असें सांगून त्यांना आग्रहपूर्वक उदेपुरास येण्याविषयीं विनंति केली. परंतु त्याचें हें आमंत्रण त्यांनीं कबूल केलें नाहीं. त्यांनीं त्यास सांगितलें कीं, 'अशा रीतीनें आह्मी येण्याला खुषी नव्होंत.

१. शत्रुंजाचा पर्वत हा, जैनांच्या पांच पवित्र पर्वतांपैकीं एक असून तेथें नेहमीं जैनांची यात्रा जात असते. मेवाडच्या राण्यांची प्रधानपरंपरा बहुतकरून जैनधर्मी पुरुषांचीच असून त्याप्रमाणें वरील प्रधान जैन असल्यामुळें तो त्या यात्रेस या वेळीं निघाला होता. कुंभोराण्याचाही प्रधान जैन असल्याचें पूर्वी (पृ० ९९ येथें) सांगितलेंच आहे.

राण्याकडून मुद्दाम बोलावणें आलें तर आह्मी उदेपुरास येऊं व नंतर तुमच्या हेतूं-प्रमाणें तुह्मीं आमची व्यवस्था केल्यास त्यांत आह्मांला संतोष आहे.' हा प्रसंग येण्याला फार दिवस लागले नाहींत. या वेळीं उमराव राणा हा भोंवतालच्या डोंगरी प्रदेशांतील लोकांची सैन्यांत भरती करीत होता व त्याला शूर सरदारांची फार जरूर होतीच. त्याच्या प्रधानानें यात्रेंत घडलेली सर्व हकीकत त्याचे कानावर घातल्यानंतर, त्यानें त्या आपल्या नातेवाईक पराक्रमी बंधुवर्गास, ताबडतोब आमंत्रण करून बोलावण्याला प्रधानास सांगितलें. हे सर्व भाऊ फार गरीब, सोसक, ममताळू आणि त्याचप्रमाणें कर्तृत्वपटु, साहसी, युक्तिमान् व एकनिष्ठ असे होते. त्यांची एकंदर हकीकत ऐकून राणा उमराव यास, त्यांजपासून आपल्याला फार उपयोग होईल असें खात्रीपूर्वक वाटलें, आणि त्याप्रमाणें त्याला शेवटीं अनुभवही आला. वर सांगितलेला अंताल किल्ला घेण्यासाटीं उमरावानें, आपल्या सरदारांपैकीं कोणाची योजना करावी याजबद्दल विचार चालविला होता. त्याच्या सरदारांत पराक्रमी आणि एकवचनी असे चोंडावत आणि सूक्तावत असे दोन शाखांचे लोकच काय ते होते. ह्मणून त्या दोघांमधून तो किल्ला कोण काबीज करितो या विषयींची राण्यानें शर्यत लाविली. त्यांत बाळो, अचलसिंग, जोधा, दीला, आणि छत्रभान असे सोळा सूक्तावत भावांपैकीं पांच भाऊ एक वेळीं किल्ला घेण्याकरितां लढत असतां मृत्यु पावले. शेवटीं त्या किल्ल्याच्या संबंधाचें यश जरी सूक्तावतांस न मिळतां चोंडावतांस मिळालें[1], तरी ज्या शूर पुरुषांनीं आपल्या स्वामिकार्यार्थ आपले जीव बळी दिले, त्यांच्या पराक्रमांचें आणि धैर्याचे पोवाडे भाटलोक अजून गातात व ती कीर्ति त्यांच्या शूरपणास अगदीं योग्य आहे. वरील उदार सेवेप्रीत्यर्थ राण्यानें त्या मृतबंधूंच्या वंशजांस भाइन्सरोर व भिंदर हे महाल बक्षीस दिले. पुढें[2] अनुक्रमानें सूक्तावतांचा फार मोठा विस्तार होऊन त्यांचे वंशीय असे दहाहजार लोक त्या वेळीं होते. हल्लीं त्या शाखेचा विस्तार फार आकुंचित होत आला आहे; तरी पांचहजार लोक आज सूक्तावतवंशीय ह्मणून तिकडे निघतील.

अस्तु; आतां आपण प्रकृत इतिहासाकडे वळूं. वरील सर्व पराजयाच्या बातम्या जहानगीरास कळून त्याला मोठी भीति पडली, आणि त्यानें आपलें सर्व सैन्य जमा

१. अंताल किल्ल्यावरील जयाची हकीकत पूर्वी (पृ० ३९ येथें) दिली आहे ती वाचकांनीं पहावी.

२. सूक्ताचे १७ मुलगे होते, त्यांत भानजी हा वडील. भानजीला पांच मुलगे होते. दयाळ, बेर, मान, गोकुळदास आणि पुरू. पुरूच्या पुढें अनुक्रमें सुबल, मोकम, उमराव, पृथ्वीराज, जैत, उमेद, खुशाल, आणि हल्लीं असणारा झोरावर अशी पुत्रपरंपरा राज्य करीत आली. हा सूक्ताचे एका पुत्राचा विस्तार झाला. असाच बाकीच्या १६ पुत्रांचा वंशविस्तार होऊन, एकंदर सूक्तावत शाखेचे वर लिहिल्याप्रमाणें हजारों वंशज मेवाडांत झाले.

करून, कसेंही करून राण्याची खोड मोडिली पाहिजे असा निश्चय केला. त्यानें स्वतः अजमीरास येऊन आपली फौज जमविली आणि लढाईला सिद्ध होण्याचें निशाण उभारिलें. त्यानें त्या फौजेवर आपला मुलगा पर्वेझ यास नेमिलें आणि त्याचा कुच व्हावयाचा तेव्हां त्याला असें सांगितलें कीं, 'जर राणा किंवा त्याचा थोरला मुलगा कर्ण ह्यांपैकीं कोणी तुजकडे येऊन त्यांनीं तुझा सत्कार वगैरे केला व तुजशीं स्नेहभावाचें आचरण केलें तर तूं त्यांच्या मुलखास कांहीं एक उपद्रव करूं नकोस.' परंतु सिसोदियावंशीयांचा दृढनिश्चयच होता कीं, मुसलमान शत्रूंस शरण ह्मणून कधीं जावयाचें नाहीं व त्यांजशीं कोणत्याही प्रकारचा स्नेह करावयाचा नाहीं. आणि त्यांतही, त्यांच्या नेहमींच्या यशस्वी विजयानें तर त्यांना मोंगलांशीं सख्य करण्याची कधीं कल्पना देखील नव्हती. उमरावानें मोंगलांची मोहीम येत आहे असें ऐकून आपल्या सैन्याची तावडतोब सिद्धता केली, आणि खामनोरच्या बारीमध्यें तो शत्रूच्या फौजेस अडविण्याकरितां सज्ज होऊन उभा राहिला. तेथें त्या उभयतांची चांगलीच चकमक झाली व तींत मोंगल फौज पूर्णपणें पराभव पावून अजमीरास पळून गेली. यामुळें मोंगल लोकांचा मोठा अपमान झाला. ही चकमक इ० स० १६११ या साली झाली. या लढाईनें जो मोंगल लोकांचा पराजय होऊन रजपुतांस जय मिळाला, तो मेवाडास अत्यंत वैभवदायक झाला, असें मुसलमानी इतिहासलेखकांनीं देखील लिहिलें आहे. ह्या लेखकांनीं त्या वेळची मुसलमानी फौजेची दुर्दशा वर्णिली आहेः सेनाधिपति पर्वेझ हा बारीमध्येंच अडकून पडला; त्यामुळें फौजेंत फार अव्यवस्था झाली; त्यांची सामग्री लुटली गेली, आणि अशा संकटांत व अडचणींत मुसलमान लोक पडले असतां रजपुतांनीं त्यांजवर हल्ला करून त्यांस अगदीं पळावयास लाविलें. या पळांत बादशाही फौजेचा फार नाश झाला व त्यांत चांगले लोक फार मेले[1]. फौज जी पळावयास लागली

---

१. लढायांची इत्थंभूत वर्णनें लिहिणें ह्मणजे, लेखकांनीं फौजांबरोबर समरभूमीवर ते युद्धाचे देखावे प्रत्यक्ष पाहिल्याविना लिहिणें चांगलें नाहीं, व लढायांचीं तशीं वर्णनें लिहूनही उपयोग नाहीं. कारण, त्यांत सत्यापेक्षां कल्पनेचीच रचना फार असते. रजपूत लोकांचे भाट त्यांच्या फौजांबरोबर असत व त्याकरितां त्यांचीं वर्णनें विश्वसनीय आहेत. परंतु काव्याच्या रीतीनें अत्युक्तिपूर्वक वर्णन करण्याची त्यांना संवय असल्यामुळें एक प्रकारें सत्य इतिहासलेखनांत तें व्यंगच दिसतें. मुसलमानी इतिहासलेखकांचा पक्षपात तर ठिकठिकाणीं उघड उघड दिसून येत असल्याचें यापूर्वी अनेक वेळां दाखविण्यांत आलें आहे. फेरिस्ता याचे लेखांत स्थलनिर्देशाच्या तर इतक्या चुका झाल्या आहेत कीं, त्याला भूगोलज्ञान कांहींच नव्हतें असें ह्मटलें तरी चालेल. तेव्हां रजपूत व मुसलमान ह्या दोघां लेखकांच्या लेखांतून उभयसाधारण व अत्युक्तिविरहित जो इतिहास मिळेल तेवढाच घेण्याविषयीं प्रयत्न केला आहे.

ती कोणाचेंच ऐकेना आणि पाठीमागून विजयी रजपुतांचा मारा सारखा चालला होताच. परंतु ह्या पळाविषयीं आणि पराजयाविषयीं खुद्द जहानगीर हा आपल्या रोजनिशींत इतकेंच सरासरीनें लिहितो कीं, "मी पर्वेझ यास परत बोलावून मला लाहोरास मिळण्याविषयीं लिहिलें; आणि त्याचा मुलगा व त्याजबरोबर कांहीं सरदार असें थोड्या फौजेनिशीं राण्यावर लक्ष्य ठेवण्यास राहूं देण्याविषयीं त्याला कळविलें."

पर्वेझ याचा वर सांगितलेला मुलगा हा प्रसिद्ध मोहबतखान याचे शिक्षेंत वाढला होता व तो चांगला पराक्रमी मोंगल होईल अशी आशा होती. जहानगीराच्या रोजनिशीप्रमाणें जरी तो पर्वेझच्या मागें राण्यावर लक्ष्य ठेवण्यास मोहबतखानासह राहिला होता, तरी त्याजकडून पर्वेझपेक्षां कांहीं ज्यास्त पराक्रम न होतां, त्यालाही रजपुतांनीं समरांगणांतून हुसकून देऊन त्याची दाणादाण केली, आणि त्यांतच शेवटीं तो मारला गेला. ह्याप्रमाणें एकामागून एक लढाया चालल्या होत्या व त्या प्रत्येकींत जरी रजपुतांकडील उच्च कुलांतले व पराक्रमी लोक पडत तरी जय त्यांचाच होई. मोंगल लोक जितके मारावे तितके पुन: मागाहून रक्तबीजासारखे चोहोंकडून येऊन बादशाही फौजेस मिळत. सारांश, त्यांचा सेनासमूह जशाचा तसाच कायम होता. मोंगल फौज जमतच जावी आणि रजपुतांनीं तिचा मोड करून जय मिळवीतच जावा. ह्याप्रमाणें सत्रा लढाया झाल्या व त्या सर्वांत रजपुतांनीं आपलें शौर्य फारच दाखविलें. त्यांच्या प्रत्येक टोळीनें आपला नायक मरेपर्यंत दमानें लढावें व शेवटीं जय मिळवावा. अशा प्रकारें त्यांचे चांगले चांगले पराक्रमी सरदार मरत ह्मणून ते मेवाडचे रजपूत त्रासून गेले कीं काय ? नाहीं. एक सरदार मेला कीं, त्याचे जागीं दुसरा नव्या दमाचा आणि आवेशाचा मनुष्य येऊन त्यानें आपल्या पक्षाचा जय पूर्ण करावा; असा क्रम चालला होता. अशा मोंगलांचा व रजपुतांच्या अनेक झटापटी झाल्या; तरी उभयपक्षांतून कोणीच दमेना. शेवटीं, बादशाहाचा सर्वांत पराक्रमी मुलगा कुरम, ज्याला इतिहासांत पुढें तख्तावर बसल्यानंतर शाहजहान बादशाह असें ह्मटलें आहे, त्याच्या हाताखालीं पूर्वींपेक्षां फार मोठी व पराक्रमी अशी फौज जमा झाली.

इकडे राण्यानेंही आपला मुलगा कर्ण याजसहवर्तमान आपली डोंगरी फौज जमा करून शाहजहान याजबरोबर सामना करण्यासाठीं पूर्वींपेक्षां ज्यास्त तयारी केली. परंतु, पुढें जी त्यांची लढाई झाली तींत राण्याचे आणखी चांगले चांगले सरदार पुष्कळ मरून राणा जेरीस आला; आणि शेवटीं त्याला शाहजहानाबरोबर तहाचें बोलणें लावावें लागलें. मेवाडाचा व मोंगलांचा वैरभाव सुरू झाल्यापासून आठशें वर्षांत अभिमानी गेहलोटवंशीय राण्यांकडून बादशाहाकडे 'शरण' किंवा 'तह'

ह्मणून अक्षरें काढण्यांत आलीं नव्हतीं. तीं ह्या वेळीं उमरावाला निरुपायानें काढावीं लागलीं. उमरावाला, पुढें नेट देऊन चाललें असतां निभाव लागेल असें मुळींच न दिसल्यावरून नाइलाजानें त्यानें शाहजहानाशीं तहाचें बोलणें लाविलें. ह्याविषयीं खुद्द जहानगीर बादशाह हा आपल्या रोजनिशींत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर लिहितो; त्यावरून ह्यासंबंधानें विशेष खुलासा समजेल:—

"माझ्या कारकीर्दीच्या आठव्या, ह्मणजे हिजरी सन १०२२, या वर्षीं मीं अजमी-
"रास जाण्याचा विचार केला; आणि त्याकरितां माझा यशस्वी व भाग्यशाली मुलगा
"कुरम (शाहजहान) यास माझ्यापुढें पाठविण्याचें ठरविलें. मीं मुलाची रवानगी
"करण्याची वेळ ठरवून त्याजबरोबर हत्ती, घोडा, ढाल, तरवार व कट्यार वगैरे त्याचें
"खतःचें सामान दिलें; आणि त्याचे तैनातीस, अजीमखान याचे हाताखालीं बाराह-
"जार घोडेस्वार व त्यांतील सरदार या सर्वांस, त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें बक्षिसें
"व इनामें देऊन, पाठविलें.

"पुढें माझ्या कारकीर्दीच्या नवव्या वर्षाचे प्रथम दिवशीं, ह्मणजे हिजरी सन १०२३
"(इ० स० १६१४) या वर्षीं, मी आपल्या तख्तावर बसलों असतां माझ्या मुलाकडून
"अलमगुमान[2] नांवाच्या हत्तीसह अठरा हत्ती आणि इतर स्त्रीपुरुषें, जीं त्यानें लढाईत
"पकडलीं होतीं तीं, मजकडे नजर ह्मणून आलीं. दुसरे दिवशीं मी त्या अलमगुमान
"नांवाच्या हत्तीवर बसून फिरावयास निघालों आणि त्या वेळीं मीं पुष्कळ
"सुवर्णदान केलें.

"नंतर मला अशी आनंदकारक बातमी आली कीं, राणा उमरावसिंग हा तहाचें
"बोलणें लावीत असून यापुढें तो, आपला आश्रित राजा होऊन राहण्यास खुषी आहे.
"माझ्या दैवशाली मुलानें राण्याचे राज्यांत जिकडे तिकडे फौजेचीं नाकीं बसविलीं अ-
"सून चोहोंकडे त्याच्या टोळ्या बंदोबस्ताकरितां फिरत होत्या. त्यांनीं ऊन पाऊस व-
"गैरे कांहींएक न जुमानतां सर्व मेवाड देशावर उत्तम रीतीनें आपला पाहरा चालविला
"होता. यामध्यें त्यांनीं कितीएक सरदारांच्या व साधारण लोकांच्या बायका व मुलेंही
"कैद केलीं. तेव्हां असाच त्यांचा क्रम चालल्यास आपली देशस्थिति बरी दिसत
"नाहीं, असा विचार करून व देशावर येणारीं संकटें बंद व्हावीं ह्मणून राण्यानें, सूप-
"कर्ण व हरिदास झाला या नांवाचे दोघे सरदार माझा मुलगा कुरम याजकडे पाठवून
"त्यांजकडून असें कळविलें कीं, 'जर तुह्मी झालेल्या गोष्टी मनांत न आणितां माझ्या
"हातांत हात घालून मजशीं स्नेहीपणा दाखवाल, तर मीही तुह्मांला जो श्रेष्ठाधिपतीचा
"मान द्यावयाचा तो देण्यास तयार आहें. व असें झालें असतां माझा मुलगा कर्ण
"यास बादशाहाचे दरबारीं त्याची नौकरी करण्यास ठेवण्याची माझी खुषी आहे. परंतु,
"ज्या अर्थीं मी वयातीत झालों आहें त्या अर्थीं, माझ्यानें बादशाहास प्रत्यक्ष जाऊन

१. वि० सं० १६६९ ह्मणजे इ० स० १६१३.

२. 'अलमगुमान' याचा अर्थ 'दुनियेचा अभिमानी' असा आहे.

"भेटण्याचें काम होणार नाहीं व त्याकरितां बादशाहाचा मजवर रोष होऊं नये.' ही
"सर्व हकीकत माझ्या मुलानें शुकर उल्ला अफजुल खानी याजबरोबर मजकडे लिहून
"कळविली.

"वरील सर्व हकीकत समजल्यावर मला फारच आनंद व समाधान वाटलें. व ही
"अशी महत्वाची गोष्ट माझ्या कारकीर्दींत घडल्यामुळें मला विशेष धन्यता वाटली.
"मीं असा विचार केला कीं, हे ह्या देशाचे जुने व शूर धनी, प्रतिकूलदैवानें आज आ-
"पल्याला शरणागत झाले आहेत ह्मणून, त्यांस त्यांच्या देशांतून घालवून देऊन त्यांचें
"राज्य बुडवून टाकणें चांगलें नाहीं. इतकी गोष्ट खरी आहे कीं, राणा उमरावसिंग व
"त्याचे पूर्वज यांस आपल्या शक्तिसामर्थ्याची खात्री व विश्वास असून त्यांना त्यांच्या
"डोंगरी लोकांच्या बलाचा पूर्ण भरंवसा असल्यामुळें व त्यांचा जात्यभिमान विलक्षण अस-
"ल्यामुळें, माझ्या कारकीर्दींत एकही हिंदु राजा मला शरणागत झाला नव्हता. मला
"नेहमीं असें वाटे कीं, असा प्रसंग माझ्या सुदैवानें कधीं येईल तर फार बरें होईल. व
"तीच इच्छा मी नेहमीं करीत असें. इतक्यांत वरील बातमी मला कळून माझ्या इ-
"च्छापूर्तीचा मला मोठा आनंद झाला. मीं, राण्याच्या ह्मणण्याप्रमाणें त्याला सर्व गो-
"ष्टींची माफी करून व सर्व प्रकारचें रक्षण आणि पाठबळ देण्याबद्दलचें अभिवचन दे-
"ऊन, माझें हस्तमुद्रा[1] करून दिलेलें फर्मान त्यास देण्याविषयीं, आपल्या मुलास लिहिलें.

"माझ्या मुलानें तें फर्मान व एक पत्र असें, आलेले सरदार सूपकर्ण आणि हरिदास
"झाला यांचे बरोबर शुकर उल्ला व सुंदरदास यांस देऊन, त्यांचे सहवर्तमान पाठविलें.
"व त्यांचे बरोबर राण्यास, आमचा थोरपणा आणि आमचा चांगुलपणा यांचेविषयीं
"खात्री बाळगण्यास व आमच्या ह्या वचनावर निःसंशयपणें अवलंबून राहून, माझ्या
"त्या फर्मानाचा व हस्तमुद्रेचा स्वीकार करून त्यांजवर विश्वास ठेवण्याविषयीं कळविलें.
"त्याप्रमाणें राण्यानेंही त्या फर्मानाचा स्वीकार करून, त्या महिन्याचे २६ वे तारखेस
"काय तो निकाल करण्याचें कळविलें.

"पुढें मी अजमीराकडे शिकारीकरितां गेलों असतां, माझा मुलगा कुरम याचा मा-
"हमूदबेग नांवाचा एक नोकर येऊन मला भेटला, व त्याणें मजजवळ एक पत्र देऊन
"तोंडानें असें सांगितलें कीं, 'राणेसाहेब कुरमसाहेबास (माझे मुलास) भेटले.' माहमूद-
"बेग यानें ही आनंदोत्सवाची बातमी मला कळविल्यावरून मीं त्यास एक हत्ती, एक
"घोडा व एक कट्यार अशीं बक्षीस दिलीं व त्याला 'झुल्फिकारखान' अशी पदवी दिली.

---

१. फार मोठ्या महत्वाचे कामासंबंधी वचन खत वगैरे लिहून द्यावयाचें असलें ह्मणजे हाताला केशर, चंदन किंवा शाई लावून तो हात कागदावर उठवावा, अशी पूर्वीपासून चाल चालत आली आहे. मुसलमानी धर्मसंस्थापक महंमद पैगंबर यानें याप्रमाणें हात (पंजे) मारून पुष्कळ राजांशीं तहनामे केले आहेत. याचप्रमाणें, अलमगीर बादशाहानें दक्षिणेंत माने व घाडगे यांस आपल्या पक्षाला मिळवून घेतेवेळीं असेच पंजे मारून त्यांस मनसबा, किताब व मरातब लिहून दिले आहेत. 'हात देणें' हें करारांचें व स्नेहदर्शनाचें चिन्ह असल्याविषयीं सर्व राष्ट्रांची समजूत आहे.

"राणा उमरावसिंग याची कुरम सुलतान याजबरोबर भेट व कुरम याची राजपुत्र "कर्ण याजशीं आपल्या सर्व उमरावांसहवर्तमान झालेली भेट, आणि राजपुत्र कर्ण "याची बादशाहाचे कुटुंबांतील मनुष्यांबरोबर झालेली ओळख, त्याला पदवी दिली, व "त्याची आणि महाराणी नूरजहान इची भेट झाली, त्याजबद्दलची हकीकत:—
"तारीख २६, रविवार रोजीं, राणा यानें, आमच्या राज्यांतील आमच्या पदरचे इ- "तर सरदार, ज्याप्रमाणें आपल्या इतमामानें व सभ्यतेनें भेटावयास येऊन, आपली सर्व "प्रकारची सन्मानबुद्धि व विनम्रभाव प्रगट करतात, त्याप्रमाणें माझ्या मुलाकडे येऊन, "त्याने त्याला आपली सन्मानबुद्धि आणि विनम्रभाव दाखविला व त्याला आपल्याजवळ "असलेल्या उत्कृष्ट माणकांची नजर केली; व त्याचप्रमाणें सोन्याचा मुलामा दिलेलीं व "मिन्याच्या मुठीचीं अशीं कित्येक शस्त्रे त्याने त्याला अर्पण केलीं. यांशिवाय, त्याचे ज- "वळ पूर्वी जे हत्ती पकडले जाऊन, काय ते सात हत्ती शिलक राहिले होते ते मोठ- "मोठ्या किमतीचे सातही हत्ती आणि उत्तम उत्तम नऊ घोडे असे नजराणा ह्मणून "त्यानें माझ्या मुलाला अर्पण केले. माझ्या मुलानेंही राजकुलीन पुरुषाला योग्य अशा "प्रकारानें राण्याचें स्वागत करून त्याचा बहुमान केला. तेव्हां राण्याने माझ्या मुलाचे "मांडीवर हात ठेवून व खालीं मान घालून, 'माझ्या अपराधांची माफी करा,' अशी "त्याची प्रार्थना केली. माझ्या मुलाने त्याचें डोके वर करून त्याला सर्व प्रकारचें आ- "श्वासन दिलें, व 'आह्मी उत्तम रीतीनें व स्नेहानें, तुमचें संरक्षण करून लागेल ती "मदत देऊं,' असें त्याला वचन दिलें; आणि नंतर त्याला उत्तम प्रकारची भेट ह्मणून "हत्ती, घोडे, तरवार, व बहुमोल चिजा अशा त्याने अर्पण केल्या. राण्याचे बरोब- "रच्या इतमामांत व तैनातीत आलेल्या लोकांमध्यें शंभरांपेक्षां ज्यास्त लोक कांहीं नज- "राणा व भेट देण्यास योग्य नव्हते; तरी माझ्या मुलाने एकशेंवीस लोकांस मोठमोठ्या "किंमतीचे पोषाख, पन्नास घोडे, आणि बारा रत्नांच्या अगठ्या अशीं बक्षिसें व नजराणे "दिले. ह्या राजांची अशी रीति असे की, त्यांच्यांत बाप आणि मुलगा कोठेंही[1] एकत्र "ह्मणून जावयाचे नाहींत. त्याप्रमाणें उमराव राणाही आपल्या मुलाला आपल्या बरोबर "घेऊन माझ्या मुलाचे भेटीस आला नव्हता. राण्याच्या वारस युवराजाचें नांव 'कर्ण' "असें असून, तोच त्याचेमागे त्याच्या गादीचा मालक होता. त्याच दिवशीं सुलतान "कुरम याने राणा उमरावसिंग याला रजा दिली व राण्यानेही, आपण गेल्यावर युव- "राज कर्ण यास पाठवून देण्याविषयीं माझ्या मुलास वचनपूर्वक सांगितलें; व त्या वच- "नाप्रमाणें त्याने आपल्या गोटांत जाऊन राजपुत्र कर्ण यास माझे मुलाकडे भेटीस "ह्मणून पाठवून दिले. तेव्हां माझे मुलानेही त्याच्या योग्यतेप्रमाणें उत्तम पोषाख,

---

१. असें करण्याचें कारण इतकेंच कीं, त्याच्यामध्ये परस्पर कपट व विश्वासघात हीं दिसून येऊं नयेत; व जो तो स्वतंत्र आहे असें दिसावे. तरी, ह्या ग्रंथाचा लेखक कर्नेल टॉड् हा ह्मणतो कीं, 'राजस्थानांतील मोठमोठ्या प्रसिद्ध राजघराण्यांतील पुरुष पितापुत्र असे एकत्र अनेकवेळां माझ्या भेटीस आले होते.'

"हत्ती, तरवार व कट्यार अशी त्याला भेट दिली. व त्याला घेऊन त्याच दिवशीं "माझा मुलगा मजकडे माझ्या भेटीकरितां आला.

"माझा पुत्र सुलतान कुरम हा युवराज कर्ण यास घेऊन अजमीरास माझे भेटी- "करितां येऊन दाखल झाला; व रीतीप्रमाणें त्यानें मजकडे आज्ञा विचारण्यास आपला "मनुष्य पाठविला कीं, 'आपली मर्जी व हुकूम होत असेल तर राजपुत्र कर्ण यास आ- "णून कदमापाशीं भेटवीन.' हा त्याचा निरोप मला कळल्यावरोबर त्याप्रमाणें मीं त्याची "भेट घेण्याचें मनांत आणिलें व कुरम यास कर्णाला घेऊन येण्याविषयीं सांगून पाठविलें. "नंतर कुरम कर्णाला घेऊन मजकडे आला व नम्रपणें मला मुजरा करून त्यानें राज- "पुत्र कर्ण यास मला भेटविलें. व त्याच वेळीं त्यानें शिफारस केल्यावरून मी कर्णाचा "सन्मान व अदबी राहण्याकरितां त्याला माझे उजव्या बाजूस बसवून त्याला उत्तम प्र- "कारचा पोषाख दिला. राजपुत्र कर्ण हा लहानपणापासून डोंगरी मुलखांत व अडाणी "लोकांत वाढलेला व खेळलेला असल्यामुळें त्याला राजदरबारांत कसें वागावें वगैरे "कांहीं एक माहीत नसल्यामुळें तो लाजत असे. त्याला राजदरबारचा कोणताही अ- "नुभव नसल्यामुळें व तेथें काय काय थाटमाट असतो हें माहीत नसल्यामुळें तो बुझ- "ल्यासारखा होई. तेव्हां त्याचें मन धीट होऊन, परक्या दरबारचा त्याला विश्वास "यावा व आपली सुरक्षता कायम राहील अशी त्याची खात्री व्हावी, ह्मणून मी त्याची रोज "रोज ज्यास्त ज्यास्त अदबी व मान वाढवीत असें. त्याची माझी भेट होऊन तो माझेजवळ "येऊन राहिला, त्याचे दुसरे दिवशीं मीं त्याला एक रत्नखचित मुठीची कट्यार बक्षीस "दिली व तिसरे दिवशीं उत्तम घोडा त्याजवरील बहुमोल सामानासुद्धां बक्षीस दिला. "नंतर त्याच दिवशीं मीं महाराणी नूरजहान इजकडे नेऊन तिची व त्याची भेट करून "दिली. तेव्हां तिनेंही त्याला पोषाख, हत्ती, घोडा, त्यांजवरील मोलवान् सामान, तर- "वार आणि जवाहीर वगैरे बक्षीस दिलें. त्याच दिवशीं मीं राजपुत्र कर्ण यास पाणीदार "व फार किंमतीचा मोत्यांचा हार दिला. चौथे दिवशीं मीं त्याला आणखी एक हत्ती दिला "व माझी इच्छा अशी होती कीं, त्याला ह्याचप्रमाणें दुर्मिळ व अपूर्व अशा आवडतील "त्या सर्व प्रकारच्या चिजा व वस्तु याव्या. त्याला मीं माझ्या शिकारखान्यांतले शि- "कविलेले तीन बहिरीससाणे व दुसरे तीन ससाणे मुद्दाम शिकवून, त्याच्या उपयोगाक- "रितां दिले व आणखी एकेक चिलखत—कड्यांचे व पत्र्यांचे—आणि दोन हिऱ्याच्या "अंगठ्या अशीं बक्षिसें दिलीं; आणि त्या महिन्याच्या अखेरच्या तारखेला मीं त्याला "मोलवान् गालीचे, सुंदर जरीचें काम केलेल्या राजदरबारी उशा, सुवासिक अत्तरांच्या "कुप्या, कित्येक सुवर्णपात्रे आणि गुजराथी बैलांची हल्लम जोडी, अशीं इनाम दिलीं.

"माझ्या राज्याचें दहावें वर्ष चालू झालें. या वेळीं मीं राजपुत्र कर्ण यास त्याच्या "जहागिरीवर[1] जाण्यास रजा दिली व त्याच्या जाण्याच्या वेळीं मीं त्याला एक हत्ती,

---

१. मेवाडच्या प्राचीन अत्यंत स्वतंत्र राजांस ह्याप्रमाणें त्यांच्या हल्लीच्या पडत्या काळीं जहागीर- दारांचे पदवीला आणून बसविलें आहे! तो महाभाग्यशाली प्रतापसिंग राणा धन्य होय कीं, तो आपल्या पूर्ण ऐश्वर्यांत आणि शौर्यवीर्यपराक्रमांत मृत्यु पावला! त्याच्या वंशजांचा हा असा अपमान व पाणउतारा व्हावा काय?

"एक घोडा आणि एक पन्नासहजार रुपये किंमतीची मोत्यांची कंठी अशीं बक्षिस दिलीं.
"युवराज कर्ण हा माझे दरबारांत प्रविष्ट झाल्यापासून तो माझेपासून रजा घेऊन जा-
"ईपर्यंत मीं त्याला एकंदर दहालाख रुपये किंमतीच्या भेटी, नजरा व इनाम देऊन,
"त्यांशिवाय ११० घोडे, व पांच हत्ती असें बक्षिस माझा मुलगा कुरम याजकडून
"त्याला मिळालें होतेंच. राजपुत्र कर्ण हा मजपासून माझा निरोप घेऊन निघाला तेव्हां
"त्याजबरोबर मीं माझा सरदार मुबारिकखान यास हत्ती घोडा वगैरे देऊन मोठ्या इ-
"तमामानें त्याला पोंचविण्याकरितां पाठविलें; व त्याजबरोबर राणा उमरावसिंग यास
"कळविण्याकरितां कित्येक विश्वासाच्या व गुप्त वातम्याही पाठविल्या.

"हिजरी सन १०२४, सफर महिन्याची तारीख ८ रोजीं युवराज कर्ण यास पांच
"हजारांची मनसबदारी दिली व त्यावेळीं त्याला मीं एक मोत्यांचा कंठा बक्षिस दिला.
"ह्या कंठ्यांत फार मोलवान् अशीं माणकेंही होतीं.

"पुढें, मोहरमच्या २४ व्या तारखेस (इ० स० १६१५) युवराज कर्ण याचा बारा
"वर्षांचा मुलगा जगत्सिंग हा माझ्या दरबारांत येऊन त्यानें मोठ्या अदबीनें माझी मुला-
"कत घेतली; व त्यानें, आपल्या बापाची आणि आजा राणा उमरावसिंग याची, अशा
"दोन अर्ज्या मजजवळ दिल्या. ह्या मुलाचा चेहरा त्याच्या शूर व प्रसिद्ध राजकुलास
"शोभण्यासारखा सुंदर होता व त्याला मीं अनेक बक्षिसें देऊन व मायेचें आणि कळ-
"वळ्याचें भाषण करून त्याचे मन साल्हाद केलें.

"शाबानच्या १० व्या तारखेस मीं जगत्सिंगाला आपल्या घरीं जाण्यास परवानगी
"दिली. व जातेवेळीं मीं त्याला वीसहजार रुपये, एक घोडा, एक हत्ती व सुंदर पो-
"षाख अशीं बक्षिसें दिलीं; व त्याच्या बरोबर जो त्याच्या बापाचा सरदार हरिदास
"झाला आला होता त्यालाही पांचहजार रुपये रोख, एक घोडा व पोषाख अशीं इनाम
"दिलीं व त्याजबरोबर खुद्द राणा उमरावसिंग याला देण्याकरितां सहा पुतळ्या
"पाठविल्या.

"तारीख २८ माहे रबी-उल्-अकबर (रबीलाखर) ह्मणजे माझ्या राज्याचें अकरावें
"वर्षे ह्या दिवशीं मी राणा उमरावसिंग व युवराज कर्ण या उभयतांचे दोन पाषाणाचे
"पुतळे घडविले होते, ते आग्रा येथील आमच्या बागेमध्यें त्यांच्यावर, त्या उभय राज-
"कुलीनांच्या यादगिरीसाठीं ते तयार करून अर्पण केल्याची तारीख घालून, स्थापन क-
"रण्याचा हुकूम दिला.

---

१. ह्या मनसबदारीनें राणा उमरावसिंग याचे वंशजांकडे खैरार, फूलिया, बेदनूर, मांडलगड, जीरन, नीमच व भाइन्सरोर इत्यादि बहुत प्रांत जाऊन, देवला व डोंगरपूर या भागांवरही अधिकार मिळाला, असें इतिहासावरून समजतें.

२. जहानगीर बादशाहाच्या रोजनिशींत अशा पुतळ्यांचा उल्लेख ठिकठिकाणीं आला आहे. परंतु ह्या पुतळ्या ह्मणजे कोणत्या व त्यांची किंमत किती होती तें पुष्कळ शोध केला असतांही आह्मांस व खुद्द मूळ ग्रंथकार कर्नेल टॅाड् यांसही समजलें नाहीं.

"माझ्या राज्याचे अकराव्या वर्षी सरदार इतिमदखान याजकडून मला लिहून कळवि-
"ण्यांत आलें कीं, 'माझा पुत्र सुलतान कुरम हा राण्याच्या मुलखांत जाऊन, त्याच्या
"व राणा आणि त्याचा मुलगा कर्ण यांच्या परस्पर भेटी आणि परतभेटी झाल्या.' त्या-
"वेळीं राण्याकडून माझ्या मुलास सात हत्ती, सत्तावीस सामान घातलेले घोडे, रत्नांनीं
"भरलेलीं तबकें आणि सुवर्णालंकार असा मोठा नजराणा मिळाला. त्यांतून माझ्या मु-
"लानें फक्त तीन घोडे ठेवून घेऊन बाकीचा नजराणा आदरपूर्वक परत केला; आणि
"युवराज कर्ण आणि १५०० रजपूत यांस लढायांमध्यें आपल्याबरोबर असावें ह्मणून
"तैनातीस घेतलें.

"माझ्या राज्याचे तेराव्या वर्षी, माझा दरबार सिंदला येथें असतां, युवराज कर्ण
"हा मजकडे येऊन त्यानें माझी भेट घेतली व मला दक्षिणेकडे जो विजय आणि यश
"मिळालें त्याबद्दलचा आनंद दर्शवून, त्यानें १०० मोहोरा, १००० रुपये, अनेक प्रका-
"रचा नजराणा आणि २१,००० रुपयांचें सोनें व रत्नें यांचे अलंकार व तसेंच अनेक
"हत्ती घोडे अशी भेट मला अर्पण केली. यांपैकीं हत्ती व घोडे मी त्याचे त्यास परत
"करून बाकीच्या भेटींचा स्वीकार केला; व दुसरे दिवशीं मीं त्याला सन्मानाचा पोषाख
"दिला; व फत्तेपूर येथूनच मीं त्याला परत जाण्यास रजा दिली. त्या वेळींही मीं त्याला
"एक हत्ती, एक घोडा, तरवार व कट्यार आणि त्याचे बापाकरितां एक उत्तम घोडा
"अशीं बक्षिसें दिलीं.

"माझ्या राज्याचे चवदाव्या वर्षी, तारीख १७ रवी-उल्-अवल (रवीलावल) हिजरी
"सन १०२९ रोजीं, मला राणा उमरावसिंग याच्या मृत्यूची बातमी कळली! मग मीं
"राजा किशोरदास याजबरोबर युवराज कर्ण यास एक दुखवट्याचें पत्र, 'राणा' हें
"पद व त्याजप्रमाणें राज्याभिषेकाचे वेळीं त्यास अर्पण करावयाचा पोषाख व उत्तम घोडे,
"असें पाठविलें. तसेंच, कर्णाचा मुलगा जगत्सिंग व भाऊ भीमसिंग यांसही पोषाख
"पाठविले. पुढें कांहीं दिवसांनीं मीं विहारीदास ब्राह्मण याजबरोबर राणा कर्ण याज-
"कडे पत्र पाठवून, त्याचा मुलगा जगत्सिंग यास त्याच्या सैन्यासहवर्तमान माझ्या मद-
"तीस पाठवून देण्याविषयीं कळविलें."

जहानगीर बादशाहाच्या या स्वतःच्या रोजनिशीवरूनच त्याच्या वेळीं मेवाडच्या राज्यांत काय काय खलबल आणि फेरबदल झाली हें समजून येतें. वर दाखल के-लेल्या रोजनिशींत जहानगीर बादशाहानें फार बारीक हकीकत खुलासेवार लिहिली आहे; व तींत ठिकठिकाणीं त्यानें आपला थोरपणा आणि औदार्य हीं व्यक्त केलीं आहेत. त्याचे मनांत आपले शत्रु जे रजपूत यांचेविषयीं कोणत्याही प्रकारें दुरभिमान आणि असन्मानबुद्धि नव्हती हें, त्यानें आपल्याकडे शरण येऊन आपल्याला वश होऊन राहिलेल्या राणा उमरावसिंगाशीं व पुढें त्याचे वंशजांशीं जें वर्तन व जो संबंध ठेविला, त्यावरून उघड दिसून येतें. रजपुतांच्या शौर्यवीर्यपराक्रमावि-षयीं त्याची बालंबाल खात्री होती; व राणा उमरावसिंग हा अनेक दुःखें व संकटें

भोगून अगदीं निरुपाय व नाइलाज झाला ह्मणूनच आपल्याला शरण आला, असें त्यानें आपल्या रोजनिशींत स्पष्ट ह्मटलें आहे. जहानगीर बादशाह ह्मणतो कीं, 'ह्या देशाचे जुने व शूर धनी, प्रतिकूल दैवानें आज आपल्याला शरणागत झाले आहेत ह्मणून त्यांस त्यांच्या देशांतून घालवून देऊन त्यांचें राज्य बुडवून टाकणें चांगलें नाहीं;' त्याचप्रमाणें राण्याविषयींची त्याचेमध्यें पूज्यबुद्धि किती होती ती, तो आपल्या रोजनिशींत जें ह्मणतो कीं, 'राण्यानें, मी वयातीत झालों आहें ह्मणून माझ्यानें बादशाहास प्रत्यक्ष जाऊन भेटण्याचें काम होणार नाहीं, असा निरोप पाठविलेला मला कळला;' आणि त्याप्रमाणें त्यानें राण्याच्या अदबीस व कीर्तीस यत्किंतूही धक्का लागूं न देतां, त्याच्याशीं जें प्रतिष्ठितपणाचें वर्तन ठेविलें तें मोंगल बादशाहांचे घराण्यांत अपूर्वच होतें, असें ह्मटलें तरी चिंता नाहीं. त्यानें, राणा उमरावसिंग हा आपला शरणागत शत्रु असें समजून त्याचा अपमान न होऊं देतां, आपल्या घराण्यांतील राजपुरुषांपेक्षांही त्याचे पुत्रास अधिक मान देऊन आपले उजवे हाताकडे बसविलें; व त्याचप्रमाणें पुढें कर्ण याच्या मुलाशींही त्याचें वर्तन होतें. तेव्हां, एकंदर राण्याच्या वंशाविषयीं तो निःसंशय सन्मान बाळगीत होता यांत संशय नाहीं. परंतु युवराज कर्ण याला, जो आपला कमीपणा वाटून लज्जा वाटत होती ती, त्याला बादशाहानें उजव्या बाजूची जागा दिली, त्याचा व त्याचे बापाचा असे सुंदर पुतळे करून आपले बागेंत त्यांचें स्मारक ह्मणून करून ठेविले, आणि त्याला मोठमोठाले अधिकार, पदव्या व बक्षिसें देऊन, त्याची योग्यता तो दिवसेंदिवस वाढवीत जात होता तरी, न जातां बादशाह जो आपल्यास जाहागीरदार ह्मणे, व आपण त्याचे मांडलिक ह्मणून जें राज्य करतों तें आपल्या पूर्वजांचे कीर्त्यैश्वर्याला कलंक आणणारें आहे असें तो मानीत असे. त्याचप्रमाणें त्याला पहिल्यापासून, १५०० रजपूत स्वारांसहवर्तमान जहानगीर बादशाहाचे फौजेबरोबर त्याचा साह्यकर्ता ह्मणून फिरावें लागे, तेंही फार अपमानकारक वाटे.

सुलतान कुरम हा स्वतः रजपूतक्षेत्रांत[1] मुसलमानबीजापासून उत्पन्न झालेला असल्यामुळें रजपुतांच्या संबंधानें विशेष अभिमान व प्रीति बाळगण्याचा थोडासा संस्कार किंवा अंश त्याजमध्यें स्वाभाविकच असे. शिवाय, कुरम हा आपल्या बा-

---

१. शाहजादा (युवराज) कुरम हा, अंबेरची कच्छवाह जातीची रजपूत राजकन्या जहानगीर बादशाहाची बायको होती तिच्या पोटीं झाला होता; आणि ह्मणून त्या जातीला अनुसरून जीं कच्छाचीं (कांसवाचीं) वाचक नांवें देतात त्याप्रमाणें 'कूर्म' या नांवाचा अपभ्रंश करून 'कुरम' (खुरम) असें नांव दिलें असावें. भाट लोकांनीं तर या नांवावर आपल्या ग्रंथांत या संबंधाचा इतिहास लिहीत असतां अनेक श्लेषपूर्वक वर्णनें केलीं आहेत !

याप्रमाणेंच थोर मनाचा आणि उदार प्रकृतीचा असे. त्याला रजपुतांशीं स्नेह व मैत्री ठेवून नेहमीं असावें असें वाटे. तो ह्मणे, 'राण्यानें, बादशाहाचें फर्मान स्वीकारलें व माझी स्नेह्याप्रमाणें आपल्या राजधानीचे बाहेर जरी भेट घेतली, तरी मेवाडांतून मी एकूणएक मुसलमान काढून घेऊन, तें राज्य राण्याचें राण्याच्या ताब्यांत देईन;' व त्याप्रमाणें जेव्हां राण्यानें केलें तेव्हां सुलतान कुरम यानेंही आपलें ह्मणणें सत्य केलें. तथापि, राण्याला, आपण केली ही गोष्ट आपल्या जातीच्या व वंशाच्या अभिमानाविरुद्ध केल्यामुळें, फार वाईट वाटून, त्यानें, पुढें अशा राज्याचा ज्यास्त उपभोग न घेण्याचाच निश्चय केला. नंतर त्यानें आपले सर्व सरदार एकत्र जमवून त्यांना आपला निश्चय कळविला; आणि त्यांची संमति घेऊन आपला युवराज कर्ण यास राज्यारोहणाचा टिळा लाविला आणि त्याप्रमाणें कर्ण याचे हातीं सर्व राज्यभार व्यवस्थेनें गेला असें पाहून, शेवटीं त्यानें वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याकरितां उदेपूर सोडून दिलें. नंतर तो त्या शहराच्या बाहेर नौचौकी[1] नांवाच्या जागीं जाऊन राहिला. तो तेथून कांहीं पुनरपि शहरांत आला नाहीं; इतकेंच नाहीं, तर त्यानें आपली रक्षा तेथें आपल्या पूर्वजांच्या समाधीजवळच पडूं दिली.

आतां राणा उमरावसिंग याचे संबंधानें ज्यास्त विस्ताराची टीका करण्याचें कांहीं कारण नाहीं. तो प्रतापसिंगाचा पुत्र शोभण्यासारखा असून, त्याचें वर्तन व पराक्रम त्याच्या रजपूत जात्यभिमानाला सोडून नव्हतें. त्याच्या शारीर व मानसिक शक्ति आणि गुण शूर पुरुषाला शोभेसे होते. तो शरीरानें मेवाडच्या एकंदर राजपुरुषांत उंच व बळकट होता. तो मेवाडच्या इतर राण्यांप्रमाणें गोरा नव्हता; तरी तो संततच्या काळज्या आणि ताप यांनींच काळा पडला होता. परंतु तें कांहीं त्याच्या स्वाधीनचें नव्हतें. त्याच्या चेहऱ्यावर शेवटीं शेवटीं उदासीनता आणि विचारमग्नता हीं विशेष दिसत. तो आपल्या सरदारांस आणि रयतेला फार आवडता असे. सरदारांस तो प्रिय असण्याचें कारण, त्याच्या मनाचा व वर्तनाचा थोरपणा आणि त्याचें शौर्य व धैर्य; आणि रयतेला तो आवडता होण्याचें कारण, तो मोठा न्यायी व दयाळू असे. राणा उमरावसिंग हा कसा न्यायी होता हें पाहण्यास, त्यानें आ-

---

१. सुलतान कुरम याची आणि राणा उमरावसिंग यांची भेट होऊन तहाचें बोलणें झालें तें याच ठिकाणीं झालें असून, त्या भेटी ज्या राजमहालांत झाल्या त्या महालाचा कांहीं भाग अझून शिलक असलेला दिसतो. हा राजवाडा उदयसिंगानें एका तळ्याचे कांठीं बांधला होता. त्या ठिकाणीं हल्लीं बागा व आंबराया असून, त्या रम्य व निवात स्थळीं तंबू ठोकून राहण्यास मला राण्यानें परवानगी दिली असल्यामुळें, मी उन्हाळ्याचे दिवसांत बहुतेक येथेंच येऊन राहत असें, असें कर्नल टॉड्, या ग्रंथाचा मूळकर्ता, आपल्या पुस्तकांत ह्मणतो.

पल्या वेळीं जे कायदे शिलालेख करून ठेवलेले अजून आपल्याला तिकडे आढळतात ते विशेष प्रमाण असून, त्याच्या कायद्यांस तिकडे जो मान आहे तोच त्याच्या शहाणपणाचा पूर्ण दर्शक आहे. हा राणा वि० सं० १६७७ ह्मणजे इ० स० १६२१ या वर्षीं वारला. हा वानप्रस्थाश्रमांत पांच वर्षें होता. मेवाडच्या राजघराण्याचे स्वातंत्र्याची राणा उमरावसिंग याजबरोबरच परिसमाप्ति झाली असें ह्मटलें तरी चिंता नाहीं !

---

# भाग अकरावा.

## राजा कर्ण.

राणा कर्ण उदेपुरास किल्ले वगैरे बांधून आपल्या राजधानीस शोभा आणितो.—मेवाडच्या राण्यांकडून बादशाहाचे दरबारी हजर न राहण्याची खटपट.—भीमसिंग हा मेवाडच्या सैन्याचा मुख्य होतो.—पर्वेझ याचे विरुद्ध सुलतान कुरम याजबरोबर सख्य.—जहानगीर बंडखोरांवर हल्ला करितो.—भीमसिंग मारला जातो.—कुरम उदेपुरास पळून जातो.—त्याचा राण्याकडून सत्कार.—राणा कर्ण याचा मृत्यु.—त्याचे मागून राणा जगत्सिंग गादीवर बसतो.—जहानगीर बादशाहाचा मृत्यु व कुरम हा 'शाहजहान' असें नांव घेऊन बादशाह होतो.—मेवाड येथें पूर्ण शांतिस्वास्थ्य.—जगत्सिंग द्वीपप्रासाद (बेटांत महाल) बांधितो.—चितोड नगराची दुरुस्ती व डागडुजी.—जगत्सिंग राण्याचा मृत्यु.—राणा राजसिंग याचें मेवाडच्या गादीवर आरोहण.—औरंगजेब शाहजहान बादशाहास पदच्युत करून आपण गादीवर बसतो.—जहानगीर व शाहजहान यांचा हिंदूंशीं सख्यसंबंध असण्याचीं कारणें.—औरंगजेबाचा गुणस्वभाव.—तो रजपुतांवर डोईपट्टी बसवितो.—औरंगजेबाशीं लग्न होणारी वधू राजसिंग पळवून नेतो व त्याच्याशीं लढण्याची तयारी करितो.—औरंगजेबाचा कूच.—गिरवोची दरी. शाहजादा अकबर राजसिंगास एकाएकीं गांठतो.—परंतु त्याचा पराजय होतो.—त्याचा डोंगरांत कोंडमारा होतो.—मेवाडच्या राजपुत्राकडून त्याची सुटका.—दिलेरखान याचा पराजय.—राणा आणि त्याचे राठोड मित्र यांजकडून औरंगजेबाचा पराजय.—औरंगजेब समरांगणांतून निघून जातो.—राजपुत्र भीमसिंग याची गुजराथेवर स्वारी.—राण्याचा प्रधान माळवा लुटतो व त्याची नासधूस करितो.—रजपूत एकवाक्यतेनें अजीम याचा पराभव करून त्याला चितोड येथून हांकून देतात.—मेवाड मोंगलाच्या ताब्यांतून सुटतें.—मारवाडांतील लढाई—सिसोदे व राठोड हे सुलतान अकबर याचा पराभव करितात.—रजपुतांची युक्ति.—औरंगजेबाला पदच्युत करून अकबराला तख्तावर बसविण्याची खटपट.—त्या कटाचा मोड.—मोंगल बादशाहाचें राण्याशीं तहाचें बोलणें.—तह.—अटी.—राण्याचा जखमांच्या दुखण्यानें मृत्यु.—त्याचे गुणस्वभाव.—औरंगजेबाच्या विरुद्ध त्याचें वर्तन आणि स्वभावगुण.—राजसमंद सरोवर. भयंकर दुष्काळ आणि पटकीचा रोग.

राणा उमरावसिंग हा विरक्त झाल्यानंतर त्याचे मेवाडच्या गादीवर त्याचा युव-

बीज त्यांस अगदीं सलत होतें व तें कोणत्या उपायांनीं नाहींसें होईल याविषयीं ते योजना पाहात होते.

मोंगल बादशाहाचे ताब्यांत जे रजपूत सरदार होते त्यांत सिसोदिया वंशाचे सरदारांनीं पुढें लौकरच आपली शक्ति आणि आपला अम्मल हीं दाखविलीं. उदेपूरच्या गादीवर नवीन बसलेला राणा कर्ण याचा भीमसिंग ह्मणून एक धाकटा भाऊ होता. पूर्वींच्या तह्प्रमाणें, ह्या राजवंशांतील एका पुरुषानें आपले एकहजार स्वार घेऊन बादशाहाचे दरबारीं सरदार ह्मणून असावयाचें होतें; व त्याप्रमाणें, कर्णाचे कारकीर्दींत तें काम वर लिहिलेला त्याचा भाऊ भीमसिंग याजकडे आलें होतें. ह्या भीमसिंगाचा व शाहजादा कुरम याचा फारच सख्यसंबंध व स्नेह जमला होता; व तो त्याचे मसलतीशिवाय बिलकुल वागत नसे. कुरम यानेंच आपल्या बापाकडे भीमसिंगाविषयीं शिफारस केल्यावरून जहानगीर बादशाहानें त्यास 'राजा' ही पदवी दिली होती; व त्याचा मान व हुद्दा वाढविण्याकरितां त्याला बनास नदीजवळील परगण्याची जहागीर दिली असून, त्या परगण्यांत ठोडा ह्मणून शहर असे तेथेंच भीमसिंग आपल्या तैनाती फौजेसह राहात असे. भीमसिंग हा मोठा महत्त्वाकांक्षी आणि स्वातंत्र्यप्रिय असा शूर तरुण असल्यामुळें, त्याणें हळू हळू आपलें वैभव दाखविण्याकरितां आपल्या ह्या जहागिरीच्या मुलखांत एक नवीन शहर आणि महाल बांधण्याचा विचार करून, बनास नदीच्या कांठीं राजमहाल नांवाचें एक शहर वसविलें; व हें शहर अर्ध शतकाच्या पूर्वींपर्यंत त्याचे वंशजांकडे होतें. ह्या राजमहालाची जरी हल्लीं उद्वस्तता झाली आहे, तरी, तेथें अवशिष्ट राहिलेल्या कित्येक इमारतींवरून वगैरे ह्या मेवाडच्या राजपुत्रास कलाकौशल्याची कशी काय रुचि व आवड होती हें समजतें. परंतु त्या शूर व वैभवशाली राजा भीमाचे वंशजांची स्थिति हल्लीं काय आहे ? त्याचा एक प्रत्यक्ष वंशज पुरुष शहापूरच्या राजाजवळ एक रुपया रोजानें नौकरीस असलेला टॉड् साहेबानें पाहिला असून, त्याबद्दल, 'दैवगतीचा व कालचक्राचा फेरा कोणावर व केव्हां कसा फिरेल याचा नियम नाहीं,' असे त्याणें दुःखोद्गार काढिले आहेत ! असो.

पुढें जहानगिराला संशय येऊन त्यास असें वाटलें कीं, सुलतान कुरम व राजा

---

आपलें वजन खर्चून शिफारस केली; व ती त्यांणींही मान्य करून हा तंटा मिटला. त्यांच्या जमिनी वगैरे काय मिळावयाच्या होत्या त्या त्यांस परत मिळाल्या. या सर्व देखाव्यावरून माझी इतकी खात्री झाली कीं, अशाही पडित काळांत ह्या रजपूत राजांची मानधनप्रीति आणि अभिमान अत्यंत जाज्वल असे ! व तो पाहून त्यावरून कोणास त्यांच्या पूर्वजांचे महान् महान् पराक्रमांविषयीं कल्पना होणार नाहीं ?

भीम यांचें जें एवढें सख्य आहे तें चांगलें नसून, भीमसिंगाला कुरमपासून वेगळें केलें पाहिजे. कारण, जहानगिराला असें वाटलें कीं, 'आपल्या मागून तख्तावर बसणारा आपला थोरला मुलगा पर्वेझ यास मागें ठेवून आपणच गादीवर बसण्याची खटपट, कुरम हा गुप्तरूपें आपला स्नेही राजा भीम याचे मसलतीनें व मदतीनें करीत आहे. तेव्हां, असें संशयाचें घर दूर करावें हें बरें.' ह्मणून बादशाहानें राजा भीम यास गुजराथचा सुभेदार नेमून तिकडे पाठविण्याचा निश्चय केला. व तसें झालें असतें ह्मणजे अर्थात् कुरम व राजा भीम हे विभक्त होऊन, त्यांच्या मसलती बंद पडल्या असत्या. परंतु तसा विभक्तपणाचा योग घडून आला नाहीं. जहानगिरानें राजा भीमाची जरी गुजराथच्या सुभेदारीवर नेमणूक करून त्यास हुकूम पाठविला, तरी ती नेमणूक पतकरण्याचें राजा भीम याणें नाकारलें. शाहजादा पर्वेझ याणें पूर्वी मेवाडावर स्वारी केली होती; परंतु राणा उमरावसिंग याणें पूर्वी पराभव करून परत लावल्यामुळें पर्वेझ याचें सामर्थ्य व शौर्य कसें काय आहे तें सर्वांना समजून चुकलें होतें. ह्मणून, राजा भीमानें आपला मित्र सुलतान कुरम यास अशी मसलत दिली कीं, 'जर तुला आपल्या वडील भावास मागें ठेवून गादी बळकावणें असेल तर अशा गुप्त मसलती करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चकचकीत उघडपणें त्याजबरोबर लढाई करण्यालाच उभें राहावें; ह्मणजे काय तो त्यांत निकाल होऊन, भागूबाईप्रमाणें गुप्त मसलतीनें तख्त कमावलें, असा लोकांचा दोष नको.' राजा भीमाची मसलत त्याच्या रजपूत बीजाप्रमाणें अगदीं अनुरूपच होती. पुढें त्या मसलतीप्रमाणें चालण्याचा निश्चय करून, कुरम याणें एकदां संधि साधून पर्वेझ यास ठार मारविलें; आणि आपण उघडपणें हातीं समशेर घेऊन बापावर बंड करण्यास उभा राहिला. त्या वेळीं त्याला, त्याचा आजा (मातामह) मारवाडचा गजसिंग राजा याचें व इतर रजपूतपक्षीय लोकांचें गुप्तपणें चांगलें साह्य होतें; तरी गजसिंग याणें सावधगिरीनें, आपण अगदीं तिऱ्हाइताप्रमाणेंच आहोंत असें दाखविण्याचा निश्चय केला होता. जहानगिरानें कुरम याचे बंडाचा मोड करण्याकरितां आपल्या लष्कराची तयारी करून, तो पुढें आला. तेव्हां त्याला गजसिंग राठोड याचेविषयीं संशय आल्यामुळें त्याणें त्याला बोलावून आणून, आपल्या फौजेचे अघाडीस नेमिलें. त्यामुळें गजसिंग याणें आपल्या बाजूचे बंडखोरांस साह्य करण्याचें निशाण गुंडाळून, आपण, मुळींच अलग राहिला. बादशाहाचें व बंडखोरांचें सैन्य आमन्यासामन्याला येऊन भिडलें. तेव्हां राजा भीमसिंगास गजसिंग राठोडाचें वर्तन बिलकुल पसंत न पडून, त्याणें त्याजकडे चकचकीत निरोप पाठविला कीं, 'तुह्माला आमच्या पक्षास साह्य करणें असेल तर उघड उघड रीतीनें करा; नाहीं तर

आमच्या विरुद्ध पक्षाला मिळून आमच्याशीं लढाई करण्यास सिद्ध व्हा.' राजा भीमाकडचा हा सडसडीत निरोप गेल्यावर, त्यामुळें गजसिंग राठोडास मोठा राग येऊन, त्याणें राजा भीमानें सुचविलेल्या गोष्टींपैकीं दुसरीच गोष्ट पतकरण्याचा निश्चय केला, व तो आपली सर्व फौज घेऊन बादशाहाचे पक्षानें बंडखोरांचा मोड करण्यास पुढें चालून आला. भीमाचे पक्षाच्या लोकांचा त्याणें अगदीं मोड केला व त्या झटपटींत राजा भीम[1] मारला जाऊन, सुलतान कुरम व मोहबतखान यांस, पळून जाऊन उदेपुरास आश्रय धरून राहणें भाग पडलें! कुरम उदेपुरास जाऊन राहिल्यावर पुढें त्याला कोणत्याही प्रकारची दगदग पडली नाहीं. राणा कर्ण यानें त्याची चांगली बरदास्त ठेविली; व तोही सुखानें आपल्या घरच्याप्रमाणें तेथें राहिला. राणा कर्ण याणें कुरम यास आपल्या एका राजवाड्यांतच कांहीं जागा नेमून दिली होती, व तेथें तो शांततेनें व स्वस्थतेनें रहात होता. तेथें त्याला मग कोणींही उपद्रव केला नाहीं. खुद्द सुलतान कुरम याचें मन रजपुतांविषयीं निर्मल असून, त्यांचेवर त्याची पूर्ण निष्ठा असे; परंतु त्याचे अनुयायी मोंगल लोकांमध्यें रजपुतांविषयीं

---

१. राजा भीम याचे, सुक्तावत राजा मानसिंग आणि त्याचा भाऊ गोकुलदास असे दोघे मित्र व मसलतगार होते. ते पहिल्यापासून राजा भीमाचे कटांत व मसलतींत असून कुरम याचा दोस्त मोहबतखान सरदार याचे बरोबरच ते नेहमीं असत. मानसिंग हा खैरार प्रांतांतील सनवर येथील संस्थान संभाळून होता; व राणा उमरावसिंग याचे कारकीर्दीत झालेल्या मोठमोठ्या लढायांमध्यें सिसोदियांचे पक्षानें मोंगलांशीं हाणामाऱ्या करण्यास तो प्रमुख होता. मानसिंग हा मोठा शूर असून, त्याला ८० जखमा लागल्या होत्या. आणि असें सांगतात कीं, त्याणें कित्येक वेळां आपल्या हाडाचे शेर शेर पापुद्रे गंगेमध्यें टाकण्याकरितां पाठविले! अशा प्रकारची राजा भीम आणि मानसिंग यांजमध्यें अकृत्रिम प्रीति होती. ह्मणून, राजा भीम मेल्याबद्दलची बातमी मानसिंग यास न कळवितां, तो जखमी होऊन आपल्या शिबिरांत (तंबूत) पडला होता, त्याजकडे भीमाचे नांवानें भोजनाचें ताट वाढून पाठविलें. परंतु पुढें त्याला राजा भीम मारला गेल्याचें वर्तमान कळल्याबरोबर त्याणें तडातड आपल्या जखमांवरचे पट्टे वगैरे तोडून व फाडून टाकले; आणि बेहोष होऊन मित्रशोकानें त्याचें प्राणोत्क्रमण झालें! पुढें त्याचा भाऊ गोकुलदास याचेविषयीं भाटांनीं असें लिहिलें आहे कीं, कर्णाच्या शांतिस्वास्थ्ययुक्त राज्यामध्यें त्याच्या पूर्वजांची कीर्तिपुष्पमाला कोमेजत व सुकत चालली होती. ती गोकुलदास याणें आपल्या रक्तसिंचनानें टवटवीत आणि पूर्ववत् ताजीतवानी केली. सिसोदिया आणि सुक्तावत या रजपुतांच्या शौर्यवीर्याविषयीं व अभिमानाविषयीं जशी भाटांनीं आपल्या ग्रंथांत चोहोंकडे वाहवा आणि स्तुति केली आहे, त्याचप्रमाणें मोहबतखान सरदाराच्या पराक्रमाची आणि अभिमानाचीही मोंगलइतिहासलेखकांनीं मोठी तारीफ आणि वडेजाव लिहिली आहे. मोहबतखानानें पुढें लौकरच मोठ्या युक्तीनें आणि शौर्यानें जहानगीर बादशाहास त्याच्याच गोटांत कैद केलें होतें, वगैरे गोष्टी मोंगलांचे इतिहासांत सुप्रसिद्ध आहेत; परंतु त्या केवळ ह्या टिपेंतच देऊन पुऱ्या होणार नाहींत.

फारच थोडा पूज्यभाव होता. सुलतान कुरम हा उदेपुरास राहिल्यावर त्याणें तेथें आपल्याकरितां आपल्या रीतीप्रमाणें मोठी किंमतवान् एक घुमटाची इमारत बांधिली; व त्या घुमटावर मुसलमानांच्या रीतीप्रमाणें खुणेकरितां अर्धचंद्राची निशाणी लाविली. ह्या इमारतींतल्या भिंतींवर वगैरे फारच सुंदर सुंदर नक्षीचीं व मनोरम कामें त्याणें करविलीं होतीं. ह्या इमारतीच्या दगडी भिंतींवर निरनिराळ्या रंगाच्या मोलवान् दगडांचीं फुलें, पत्त्या व वेल दाखवून, तें एक अपूर्व काम उदेपुरामध्यें त्याणें तयार करविलें होतें. त्याचप्रमाणें, त्याणें त्या सर्व इमारतींत अंथरण्याकरितां तुर्कस्थानचे सुंदर सुंदर व बहुमोल गालीचे आणून चोहोंकडे पसरून ठेविले होते. ह्याप्रमाणें ह्या शाहजाद्यास, तो परमुलखांत आश्रय करून राहिला ह्मणून कोणत्याही गोष्टीचा कमीपणा वाटण्याचें कारण नव्हतें. त्याणें आपल्या महालांत, एक जाड लांकडाचें सुंदर चौकोनी सिंहासन कोरवून, तें सिंहासन चार बाजूंनीं चार पऱ्यांनीं (अप्सरांनीं) आपल्या हातांवर तोलून धरलें आहे असें दाखविलें होतें; व तें त्या इमारतीचे मध्यभागीं कचेरीच्या जागीं ठेविलें होतें. कुरम याणें ह्या इमारतीचे आवारांतच आपल्या धर्माप्रमाणें प्रार्थना करण्याकरितां एक लहानशी मशीद बांधिली व त्या मशिदीवर त्याणें कोणी मदार नांवाचा एक फकीर मुख्य नेमून, त्याचे ताब्यांत तें प्रार्थनामंदिर दिलें. ह्या ठिकाणीं कांहीं दिवस कुरम याणें वास्तव्य करून, नंतर तो इराणांत[1] जाऊन स्वस्थतेनें होता. तो पुढें जहानगीर बादशाह मरण्याचे पूर्वीं कांहीं दिवस तिकडून आला.

राणा कर्ण याणें, आपल्या पडत्या काळांत आपल्याला ज्याणें पारतंत्र्याचा डाग जरी लाविला तरी, ज्याणें त्या काळीं आपला सर्व प्रकारचा चांगल्या रीतीनें मान राखून सांभाळ केला, त्याजवरच काळ फिरून, आपलें पूर्वस्वातंत्र्य पुनः मिळविण्याचा प्रसंग आला असतां, कृतोपकार स्मरून, शाहजादा कुरम याचें सर्वप्रकारें रक्षण केलें. ह्या प्रकारची रजपूतजातीच्या राजकुलीनांची कृतज्ञ बुद्धि होती, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे! सिसोदिया रजपूतराजघराण्याचे कृतज्ञबुद्धीविषयीं जी प्रख्याति आहे ती ह्मणजे अल्प काळच टिकणारी आहे असें नसून, ती चिरकाळ राहील यांत संशय नाहीं. याशिवाय, त्या वेळची एक विशेष गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, जेव्हां कुरम, राणा कर्ण याजकडे आश्रय मागावयास गेला, तेव्हां तेथें गेल्याबरोबर त्यानें आपलें पागोटें व ढाल काढून राण्यापुढें ठेविलीं, आणि गुडघ्यावर बसून त्यानें त्याची प्रार्थना केली कीं, 'आतां माझी अब्रू राखून माझें रक्षण करणें

१. कोणी तत्कालीन इतिहासलेखक असें ह्मणतात कीं, कुरम हा इराणांत न जातां गोवळकोंड्यास जाऊन राहिला होता.

तुमचेकडे आहे.' त्याबरोबर राण्यानें आपल्या डोक्याचें पागोटें काढून त्याचे डोक्याला घातलें, आणि त्यानें काढून पुढें ठेविलेलें पागोटें आपण घातलें[१]; व येणेंप्रमाणें त्याच्या संरक्षणाविषयीं त्यानें त्याला पूर्ण आश्वासन दिलें. कर्णाचे मागून मेवाडावर मोंगल, पठाण व मराठे ह्या लोकांकडून पुष्कळ वेळां स्वाऱ्या झाल्या; परंतु कुरम याचें पागोटें त्या वेळीं जसें बांधलेलें होतें व राणा कर्ण यानें ज्या स्थितींत त्याचा स्वीकार केला, त्याच स्थितींत व जसेंच्या तसेंच बांधलेलें आजपर्यंत उदेपुरास राखून ठेवलेलें पाहण्यांत येतें ! व कुरम याची तीच ढाल अजून नीट रीतीनें टांगून ठेवलेली दृष्टीस पडते ! त्याचप्रमाणें, कुरम यानें मुद्दाम बांधलेल्या त्या मदारच्या मशिदींत, रात्रीं दिवा लावण्याची जी उदेपूरच्या राजदरबारांतून नेमणूक झाली आहे तीही अद्यापि तशीच अखंड चालली आहे[२]!

असो; राणा कर्ण यानें आठ वर्षेपर्यंत राज्योपभोग घेतला. त्यानें कुरम यास आश्रय दिल्यामुळें जहानगीर यास विशेष समाधान किंवा कर्णाविषयीं विशेष अभिमान उत्पन्न झाला, असें ह्मणतां येत नाहीं. तथापि, त्याला इतकें खास कळून चुकलें कीं, कर्ण हा, आपला भाऊ राजा भीम याचेप्रमाणें भलतींच कृत्यें करण्यास आपल्या

---

१. एकमेकांचें पागोटें बदलणें यांत विशेष भाऊपणा आणि सख्यसंबंध झाला, असें समजण्याची रजपूत लोकांत चाल आहे.

२. सिसोदिया वंशाचें वचनप्रामाण्य, कृतज्ञबुद्धि आणि धार्मिकपणा हीं किती कडक होतीं हें पाहण्यास वरील उदाहरण बस होईल असें वाटतें. ज्या लोकांनीं त्यांना अत्यंत नीचतेनें वागविलें व त्यांचें सर्वस्व हरण करून त्यांच्या वंशजांची वाताहत केली त्या मुसलमान लोकांच्या एका शाहजाद्याच्या वचनास गुंतून, त्यानें त्यांच्या स्वाधीन केलेल्या वस्तूंचा व धर्मसंबंधी देवळाचा (मशिदीचा) इतक्या उत्तम रीतीनें एकसारखा परंपरेनें संभाळ आणि संरक्षण करीत जावें, ही सामान्य गोष्ट नाहीं; हें कांहीं वेगळें सांगणें नकोच. ह्या सर्व रजपूत लोकांच्या गोष्टी मनांत आणून, कर्नेल टॉड् ह्मणतो कीं, 'ह्यावरून अशा नीतिमान् व खऱ्या हृदयाच्या लोकांशीं आपण सख्यानें व मित्रत्वानें राहणें बावगें होईल काय? अथवा, ह्या फार दिवसांपासून गरिबीला पोंचलेल्या व जुलूम सोशीत आलेल्या लोकांस आणखी त्रासवून व त्यांचा अपमान करून, त्यांचें मन आपलेविषयीं द्वेषयुक्त किंवा तिरस्कारपूरित करावें हें योग्य होईल? कर्नेल टॉड् आणखी ह्मणतो; 'उदेपूरच्या संग्रहालयांत इतक्या काळजीनें आणि हेतुपुरस्सर राखून ठेवलेलें शाहजहान (कुरम) बादशाहाचें तें नारंगी रंगाचें पागोटें आणि ढाल हीं, त्यांच्या पवित्र कोनाड्यांतून पाहण्याकरितां मीं मुद्दाम आणविलीं होतीं. त्या दोन्ही वस्तु पाहून व त्यांची ज्या रीतीनें व पवित्र बुद्धीनें जोपासना करून ठेविली होती ती बुद्धि माझे मनांत येऊन, मला त्या वस्तूंविषयीं पूज्यबुद्धि आणि सन्मान उत्पन्न झाला; आणि त्या जोपासना करणाऱ्या रजपूत सन्मित्रांचे संबंधानें माझ्या अंतःकरणांत एक प्रकारचें प्रेमाचें भरतें आलें ! मीं त्या पागोट्याला प्रणाम करून तें व ती ढाल हीं त्यांच्या नियमित ठिकाणीं नेऊन ठेवण्याकरितां मोठ्या सत्कारानें परत पाठविलीं.

मुलाला मसलत व उत्तेजन देईल असें नाहीं. कर्णाचे मागून त्याचा मुलगा जगत्सिंग (जगत्सिंह) हा वि० सं० १६८४ ह्मणजे इ० स० १६२८ या वर्षी गादीवर बसला.

बादशाह जहानगीरही पुढें लौकरच मेला. तो मेला तेव्हां त्याचा मुलगा कुरम हा आपल्या अज्ञातवासांत हद्दपार झालेला होता. जहानगीर मेल्याची बातमी जगत्सिंग राण्याला समजतांच त्यानें आपला भाऊ आणि रजपूत लोकांची एक टोळी अशी सुरतेस पाठविली व तेथें कुरम होता त्यास तें वर्तमान कळवून, तेथून त्यास बादशाह ह्मणून मोठ्या समारंभानें दिल्लीस चालविलें. शाहजादा कुरम हाही मोठा कृतज्ञ असल्यामुळें, दिल्लीस जातांना तो पहिल्यानें उदेपुरास उतरून त्यानें राण्याची मुलाखत घेतली. ह्या मुलाखतीचा दरबार उदेपुरास राण्याच्या राजवाड्याचे बादलमहाल (मेघप्रासाद) नांवाच्या एका दिवाणखान्यांत भरला होता. तेथें कुरम यास 'शाहजहान' असें नांव देऊन, व त्याला जीं राजचिन्हें द्यावयाचीं तीं देऊन, राण्यानें त्याला तेथेंच 'बादशाह' असें ह्मटलें. शाहजहान हा राण्याच्या ह्या मोठ्या सत्कारामुळें व योग्य साह्यामुळें फार खुष होऊन त्यानें राण्यास, त्याचे जे प्रांत पूर्वी बादशाहीकडे खालसा केले होते त्यांतील पांच महाल परत दिले. त्याचप्रमाणें, राण्याला त्यानें एक बहुमोल माणिक बक्षिस देऊन त्याला अत्यंत प्रेमानें आलिंगन दिलें; व चितोड येथील तटबंदी व किल्लयाची दुरुस्ती करण्याची त्यास परवानगी दिली.

राणा जगत्सिंग यानें सव्वीस वर्षें राज्य केलें. इतक्या मुदतींत कांहीं विशेष झालें नाहीं. सर्वत्र शांततेनें आणि व्यवस्थित रीतीनें कारभार चालला होता. त्यामुळें जगत्सिंग राण्याचे कारकीर्दीच्या संबंधानें भाटांना कांहींएक वर्णन करण्यासारखा विषय मिळाला नाहीं. जेव्हां लढाया व युद्धें चालून जिकडे तिकडे धामधूम चालली असते तेव्हां, भाट लोकांना आपल्या कवित्वाला ते चांगले विषय होऊन, त्यांचे मोठमोठे ग्रंथ होतात. परंतु तशा प्रकारच्या धामधुमी वगैरे जगत्सिंग राण्याचे अमदानींत कांहीं एक झाल्या नसून, त्याचें राज्य ह्मणजे शांतता व मुख्यत्वेंकरून शिल्प व कलाकौशल्याचीं कामें हीं वाढविण्याविषयींच प्रख्यात आहे. आणि, आज उदेपुरास ज्या मोठमोठ्या इमारती व भव्य आणि सुंदर कामें दिसत आहेत, तीं सर्व त्याच्या शिल्पकलाभिरुचीचीं द्योतकच आहेत. ज्या उदेपुरावर जगत्सिंगाच्या पुढें कित्येक

---

१. मुसलमान इतिहासलेखक फेरिस्ता ह्याच्या लेखांत भूगोलज्ञानाच्या फार चुका असलेल्या दृष्टीस पडतात. त्यानें कुरम यास एकदम अजमीरास नेलें व तेथून पुढें दिल्लीस नेलें आहे. परंतु भाट यांचे लेख विशेष प्रमाण आहेत. त्यांत याविषयींचें सविस्तर वर्णन दिलें आहे. प्रथमतः कुरम याचीं राजचिन्हें व राजध्वज घेऊन मोहबत, अबदुल्ला, खानजहान, व बुसादुल्ला चिटणीस, असे पुढें घेऊन गेले होते, असें भाटांनीं लिहिलें आहे.

उलाढाल्या व धामधुमी झाल्या त्यांतून बचाव धरून राहिलेलीं जीं कामें आज आपण पाहतों, त्यांवरून त्यांच्या टिकाऊपणाविषयीं आपल्याला आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं !

उदेसागर तलावाच्या बाजूला बांधलेला 'जगन्निवास' नांवाचा राजवाडा जगत्सिंग राण्यानेंच आपल्या कारकीर्दीत बांधण्यास सुरुवात करून पूर्ण केला. ह्या जगन्निवास राजवाड्याकडे चार एकर जमीन गुंतली आहे. त्याचप्रमाणें ह्या सागरांतल्या दुसऱ्या एका बेटावर 'जगमंदिर' नांवाचा एक सुंदर महाल जगत्सिंग राण्यानेंच बांधला आहे. ह्या दोन्ही वाड्यांचीं मोठमोठीं पाषाणशिलांनीं बांधलेलीं महाद्वारें, अरसपान व संगमरवरी जातीच्या दगडांचे भव्य व सुंदर खांब, स्नानगृहें, उस्वास, हौद, कारंजीं, वगैरे अनेक रम्य व दर्शनसुखावह भाग पाहून, आपल्या पाहण्याचें सार्थक झाल्यासारखें वाटतें. जिकडे तिकडे संगमरवरी दगड लाविलेला दिसतो व तो दगड घडवून घोंटण्याचीही फार मेहनत केलेली दिसते. ठिकठिकाणीं जमीनीवर अनेक रंगांच्या दगडांचे गालीचे बनविलेले व भिंतींवर नामी नामी तशाच प्रकारच्या दगडांचीं फुलें, पत्त्या व वेल दाखविलेले पाहून, त्या वेळच्या कारागिरीचें आणि राज्यकर्त्यांच्या अभिरुचीचें एक दर्शनच होतें. त्याचप्रमाणें, ठिकठिकाणीं खिडक्यांना निरनिराळ्या चित्रविचित्र रंगांचीं तावदानें बसवून, त्यांतून वारंवार बदलणारा उजेड आंतल्या भागांवर पडला ह्मणजे, ती एक विलक्षणच मौज दिसते! महालांतल्या भिंतींवरून अनेक प्रकारच्या पक्क्या रंगांनीं ऐतिहासिक भागांतलीं उत्तम उत्तम चित्रें, चांगल्या कुशल व कसबी चित्रलेखकांकडून काढविलेलीं अजून दृष्टीस पडतात. हीं चित्रें इतकीं पक्कीं काढलेलीं आहेत कीं, जणूं काय, तीं त्या मोठमोठ्या व विस्तृत भिंतींवर खोदूनच काढलीं आहेत अशीं वाटतात! ह्मणजे, इतकीं तीं त्या भिंतींत भेदलीं गेलीं आहेत. आतां कालांतरामुळें त्या चित्रांच्या रंगांत मलिनपणा दिसतो व मध्यें मध्यें कोठें काळे डाग पडलेले आहेत; परंतु, त्या कामास आजपर्यंत गेलेला अवधि आणि प्रत्येक वस्तूवर होणारी हवेची व वातावरणाची क्रिया हीं मनांत आणिलीं ह्मणजे आज आपण जो भाग पाहतों तो सर्व चांगल्याच स्थितींत असून, उत्तम रीतीनें टिकला गेला असें ह्मणण्यास हरकत वाटत नाहीं. वर सांगितलेल्या जगमंदिरांतील आणि जगन्निवास राजवाड्यांतील भिंतीवर काढलेल्या ऐतिहासिक चित्रांत राणा जगत्सिंग यानें आपल्या लग्नसमारंभापर्यंतच्या हकीकतींचीं चित्रें काढविलीं आहेत. बरें, ह्याप्रमाणें नुस्ते महाल व मंदिरें बांधूनच राणा राहिला नाहीं. ह्या मंदिराच्या व महालाच्या बाहेर आलें तर रूक्ष व भणभणीत दिसूं नये ह्मणून त्या हवेल्यांच्या सभोंवतीं मजेदार फलपुष्पांचीं उपवनें बनविलीं आहेत. त्यांत आंबा, नारळी,

ताड, निंब, चिंच व खिरणी, यांचे मोठमोठ्या गगनचुंबित आणि विस्तृत छायेच्या वृक्षांची अगदीं गर्दी करून दिली आहे. ठिकठिकाणीं पुष्करिण्या बांधून तेथें राजकुलीनांच्या स्नानाच्या सोई आणि विहार करण्याच्या जागा केल्या आहेत. त्याचप्रमाणें, अफू खाऊन गुंग होऊन पडण्याची व भाटांनीं गाइलेल्या आपल्या स्तुत्या व बडेजावी या संबंधाच्या कविता ऐकण्याची जी मेवाडच्या राण्यांची संवय आणि रीति होती त्यासाठीं, मुद्दाम अनेक स्वतंत्र स्थळें केलीं आहेत. ह्या सर्व उद्यानांतून जाण्याकरितां मधून सुंदर वाटा केल्या आहेत. ह्या आरामांत फिरलें असतां जिवाला आराम वाटतो, व चित्ताला हुशारी येते. राणा जगत्सिंग यानें बनविलेल्या ह्या स्थलांचीं वर्णनें भाटांनीं फारच रसभरित केलीं आहेत, व तीं मिथ्या नाहींत असें सध्या देखील कोणासही वाटेल. ह्या उपवनांतील तुडुंब भरलेल्या जलतडागांत पाण्याच्या सपाटीबरोबर चोहोंकडे पसरलेल्या कमलपत्रांची अगदीं दाटी झालेली असते; व त्या पानांच्या दाटींतूनच मधून मधून कमलें आपलीं डोकीं वर काढून, तीं सूर्योदयानंतर प्रफुल्लित होतात तेव्हां, त्यांची जी शोभा दिसते ती कवीच्या स्फूर्तीस आणि वर्णनास अनुरूप अशीच असते! याचप्रमाणें पेशोळा तलावाचा तो विस्तृत जलपृष्ठभाग आणि त्याचे भोंवतालीं असलेल्या गर्द वनछायेचें त्यामध्यें पडलेलें प्रतिबिंब यांची शोभा तर अत्यंत आल्हादकारक असते. ह्या तळ्याच्या कांठीं उभें राहून दूर दृष्टि फेंकली ह्मणजे ब्रह्मपुरी ह्मणून एक देवालय अत्युच्च अरवली डोंगराकडे जाणाऱ्या रस्त्यावरच असलेलें दृष्टीस पडतें. त्या देवळाच्या पलीकडच्या अंगास, मेवाडच्या शूर रजपूत राजांनीं जीं युद्धें केलीं त्यांचीं विस्तृत रणांगणें आहेत. परंतु आतां त्या रणांगणांचा काय उपयोग आहे? हल्लींचे राणे व त्यांचे सरदार खाऊन पिऊन सुखांत व चैनींत दिवस काढीत आहेत. त्यांना आतां कशाचीही काळजी नाहीं. त्यांना त्या रणभूमीकडे पाहण्याचेंही कारण नाहीं. पूर्वी जेथें मोठमोठे प्रतापी वीर महावीर आपल्या पराक्रमानें शत्रूस चळचळां कांपवीत होते तेथें आतां त्या तलख प्रकृतींच्या वंशांत तोंडावरच्या माशा वारण्यासही दुसरीं नौकर माणसें लागतात, अशा प्रकारचे पोस्ती व निष्पराक्रम पुरुष निर्माण व्हावे! कालमहिमाच असा!

जगत्सिंग राणा हा लोकप्रिय आणि सर्वमान्य राजा होता; व त्याचा मानसन्मान व इभ्रत हीं दांडग्या मोंगल लोकांस लाजवीत असत. त्याचें स्वतःचें वर्तन, त्याची परोपकारबुद्धि आणि त्याची राज्यव्यवस्था ह्यांविषयीं, ज्यानें ज्यानें त्याजकडे जाऊन त्याच्या भेटी घ्याव्या त्यानें त्यानें त्याची स्तुतिच करावी. ह्याबद्दलचे दाखले पहावयाचे असले तर, खुद्द दिल्लीच्या बादशहांचे लेख, ह्या देशांत इंग्लंडच्या तर्फेनें आलेल्या वकील लोकांचा पत्रव्यवहार, आणि मेवाडचे ऐतिहासिक दाखले, हे पाहिले

ह्मणजे खात्री होईल. जगत्सिंग राण्याकडे, आपली प्राचीन राजधानी चितोड शहर याची उत्तम प्रकारें दुरुस्ती करून त्याला पूर्ववैभवाला पोंचविलें, ह्याबद्दलचें पूर्ण यश येतें. त्याचप्रमाणें, त्यानें 'माळाबुरूज' नांवाचा छोटासा जुना किल्ला पुन्हां बांधिला, तेव्हां त्याचे दरवाजे आणि छत्रकोटाच्या देवळाचा कळस हेही नवेच केले. राणा जगत्सिंग याच्या बायकांपैकीं जी मारवाडची राजकन्या होती, तिच्या पोटीं त्याला दोन पुत्र झाले. त्यांतील थोरला मुलगा त्याचे मागून गादीवर बसला.

जगत्सिंग राणा वि० सं० १७१० ह्मणजे इ० स० १६५४ या वर्षी मृत्यु पावला, व त्याचे जागीं वर लिहिल्याप्रमाणें त्याचा वडील मुलगा राजसिंग (राजसिंह) हा राणा झाला. परंतु अनेक कारणांनीं त्याच्यानें आपल्या बापाच्या वेळचें शांतिस्वास्थ्य राखवलें नाहीं. त्याची स्वतःची वर्तणूक, आपल्याकडे सर्व अम्मल राखून, सर्वांवर सारखा दरारा ठेवण्यासारखी नव्हती. मोंगल बादशाह शाहजहान हाही अतिशय वृद्ध झाला असून, त्याच्या मुलांमध्यें बादशाहाचे गादीवर कोणीं बसावें याजबद्दलचा मोठा वाद चालला होता. त्या मुलांमध्यें प्रत्येकास आपण बादशाह होण्याची इच्छा असून, प्रत्येकजण आपल्या दुसऱ्या भावांस शत्रुस्थानीं लेखीत असे. बादशाहाचे कुटुंबांतील हा कलह रजपुतांचे चांगल्याच पथ्यावर पडला; व प्रत्येकास निरनिराळ्या रीतीनें रजपुतांकडून साह्य मिळण्याची उमेद होती. राणा राजसिंग यानें, तख्ताचा कायदेशीर वारस जो थोरला शाहजादा दारा यास साह्य करण्याचा निश्चय केला. परंतु पुढें फत्याबाद येथें जी लढाई झाली तींत, त्या सर्व भावांत औरंगजेबाचाच विजय होऊन त्याला फत्ते मिळाली. तेव्हां औरंगजेब यानें त्या जयाचे धुंदींत, त्याला आपल्या महत्वाकांक्षेस अवरोधक किंवा प्रतिबद्धक असे जे जे आढळले त्यांचा त्यांचा एकसारखा सत्यानास चालविला; इतकेंच नव्हे, तर त्याची ही राज्याभिलाषतृष्णा इतकी अनावर झाली कीं, शेवटीं शेवटीं त्याचा बाप, भाऊ आणि खुद्द त्याचे मुलगे हे तिच्या शांततेकरितां बळी पडले! परंतु औरंगजेबाच्या ह्या विलक्षण महत्वाकांक्षेचा परिणाम नीट झाला नाहीं. शेवटीं मोंगल बादशाहीचा मात्र नाश झाला.

मोंगल बादशाहांनीं ज्या धोरणावर रजपुतांशीं सख्य ठेवून त्यांच्या मुली आपल्या

---

१. माळाबुरूज हा छोटासा किल्ला देवळाच्या आकाराचा असून, तो अकबरानें तोफा लावून उडवून दिला होता.

२. मूळ ग्रंथकार कर्नल टॉड् याजजवळ दारा, सुजा, मुराद आणि औरंगजेब या चौघांच्या स्वदस्तूरचीं मूळचीं अस्सल पत्रें राणा राजसिंग यास येऊन, त्यांत त्या प्रत्येकानें त्याची मदत मागितल्याबद्दलचीं, असल्याबद्दल त्यानें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे.

बायका केल्या होत्या, त्यांतील हेतु आणि तत्व हीं त्या वेळीं कोणास कळलीं नसावींत असें वाटतें. कारण, त्या परस्परांचे जे संबंध झाले ते केवळ मुसलमानांच्याच शिरजोरपणानें झाले, असा त्या वेळच्या इतिहासलेखकांचा समज आहे. भाटांचे लेख किंवा फेरिस्ता याचे लेख यांजमध्यें पाहिलें तर, अशा बेटीव्यवहाराचे संबंधांत दुसरा कांहीं त्या बादशाहांचा राजकारणाचा हेतु होता, याचा कोणींच उल्लेख केला नाहीं. रजपूत हे पहिल्यापासून शूर व सच्या वर्तनाचे असल्याविषयीं मोंगल बादशाहांची बालंबाल खात्री झाली होती. तेव्हां, असे लोक जर आपले मित्र आणि आप्त झाले तर आपल्या बादशाहीस चांगली बळकटी येईल, या धोरणावर त्यांनीं रजपूतकन्या आपल्या बायका केल्या, व त्यांच्या त्या हेतूप्रमाणें पुढें पुढें अनुभवही येऊं लागला. अकबर बादशाहापासून रजपूतकन्यांशीं विवाहसंबंध करण्याची रीति निघाली; व त्याच रीतीचें व त्याच्याच धोरणाप्रमाणें पुढें जहानगीर व शाहजहान या बादशाहांनींही अनुकरण केलें. खुद्द जहानगीर हा अंभेरच्या राजकन्येच्या पोटीं झाला असून शाहजहान हा मारवाडच्या राजकन्येच्या पोटीं झाला होता. परंतु औरंगजेब हा कांहीं रजपुतानीच्या पोटीं जन्मला नसून, त्याची आई तार्तरी देशची असून तो पूर्णपणें मुसलमानी रक्ताचाच बनला होता; व त्यामुळें, जसा जहानगीर व शाहजहान यांचा ओढा रजपुतांकडे स्वभावतःच विशेष असे, तसा औरंगजेबाचा ओढा रजपुतांकडे मुळींच नसे. कारण, रजपुतांविषयीं त्याला कोणत्याही प्रकारें माया किंवा अभिमान नसे. तथापि, त्याला आपल्या बापजाद्यांचें, रजपुतांशीं सख्यसंबंध ठेवण्यांत काय धोरण होतें हें कळलें होतें; व त्याप्रमाणें त्यानें पुढें आपलाही क्रम आणि धोरण ठेवण्याचा यत्न केला. त्यानें, आपले मुलगे शाहअलम व अजीम यांचीं लग्नें रजपुतानींशींच लावून दिलीं व रजपुतानीच्या पोटींच झालेला त्याचा आवडता नातू कामबक्ष[१] याचाही विवाहसंबंध रजपूतकन्येशींच केला होता. तरी, औरंगजेबाचा राजकारणापेक्षां धर्माभिमान फारच कडक असल्यामुळें त्यानें आपल्या वडिलांचें धोरण एकीकडे ठेवून, रजपुतांशीं अत्यंत द्वेषानें आचरण ठेवावें. परंतु तसें करणें सुतराम् चांगलें नव्हतें.

औरंगजेबाची राज्याभिलाषतृष्णा जास्त जास्त वाढून, पुढें त्या तृष्णेला त्याचा वडील भाऊ दारा याचा सुस्वभाव व थोर बुद्धि, दुसरा भाऊ सुजा याची चपलता व सावधगिरी, आणि तिसरा भाऊ मुराद याचें बल आणि पराक्रम हीं सर्व

---

१. कामबक्ष ह्मणजे कामदेवाची देणगी किंवा प्रसाद.

बळी पडून, त्या तिघांचाही त्यानें एकामागून एक नाश केला ! ह्या गोष्टी मुसलमानी इतिहासांत सुप्रसिद्ध आहेत. परंतु त्या गोष्टींचा मेवाडच्या इतिहासाशीं कांहीं संबंध नसल्यावरून, त्याही गोष्टी येथें घेऊन ग्रंथविस्तार करण्याचें वर्ज केलें पाहिजे.

औरंगजेबाचे वेळेस रजपुतस्तानांत एककालीं जितके व जसे नामांकित व पराक्रमी राजे होते तितके व तसे राजे पूर्वी कधींही कोणाच्या वेळेला नव्हते. अशा राजांशीं औरंगजेबानें जर आपल्या वडिलांप्रमाणेंच सख्यभाव ठेविला असता तर किती चांगली गोष्ट झाली असती ! इतक्या राजांचें साह्य मिळून दिल्लीची बादशाही मोठ्या बंदोबस्तांत आणि आपल्या पूर्ववैभवांत कायम राहून, हिंदुमुसलमानांमधील द्वेषाग्नि जास्त भडकण्याचें कांहीं एक कारण राहिलें नसतें. परंतु औरंगजेबाचें धोरण चुकलें व तो केवळ धर्माभिमानाच्या स्वाधीन होऊन, त्यानें रजपुतांस अगदीं पाण्यांतच पाहण्याचा क्रम चालविला होता. व तो क्रम शेवटपर्यंत कमी ह्मणून न होतां, त्याच्या रजपूतविषयक द्वेषोष्म्याची उष्णता जास्त जास्त अंशांवर चढत गेली. त्याच वेळीं रजपुतस्तानांत कसकसे पराक्रमी व थोर थोर राजे होते ते पहा:—अंबेरचा जयसिंग राजा, यास तर 'मिर्जा राजा' असें त्या वेळीं ह्मणत असत. त्याचप्रमाणें, मारवाडचा जसवंतसिंग व त्याचे बरोबरच बुंदी आणि कोटा येथील हाडे राजे; आणि बिकानीरचे राठोड राजे आणि ओर्चा व दत्तिया येथील बुंदेले राजे या सर्वांच्या विचारानें आणि एकमतानें जर औरंगजेब चालला असता तर मोंगलाई अधिकार चांगल्या दृढ पायावर कायम झाला असता. परंतु औरंगजेबाचा एकमार्गी विचार त्याचे राज्यसत्तेच्या नाशास कारण झाला. त्याच्या धर्मवेडाचे योगानें सर्व हिंदुलोक त्याजविषयीं नाखुष होऊन, जो तो त्याला अधिकारभ्रष्ट करण्याची संधि पाहूं लागला. त्याच्या ह्या धर्मखुळानेंच दक्षिणेकडे शिवाजीला आपल्या महाराष्ट्रीय (मराठे) लोकांस स्वातंत्र्य मिळवून देण्याची स्फूर्ति झाली; आणि त्याच्या धर्मासक्तीनेंच त्याला एकाही रजपूतराजाकडून मदत मिळेनाशी होऊन, सर्वजण त्याजवर उठले. इतक्यांच्या मारांतून त्याची वांचण्याची किंवा बचण्याची आशा व संभव नव्हताच. त्या काळीं औरंगजेबासारखा

१. औरंगजेबाकडून आपल्या भावांची जी गति झाली ती प्रत्यक्ष बर्नीर नांवाच्या एका लेखकानें स्वत: बघून लिहून ठेविली आहे, ती फेरिस्ताच्या लेखांपेक्षां विश्वसनीय आणि खात्रीची असून, ती मेवाडच्या भाटांनीं लिहिलेल्या हकीकतीशीं विशेष रीतीनें मिळते; आणि ह्मणून, इतिहासज्ञांनीं ह्या संबंधाचा इतिहास पाहणें असल्यास फेरिस्ताच्या इतिहासापेक्षां बर्नीर याचा इतिहास मुख्यत्वेंकरून पहावा.

शूर व विद्वान् असा कोणीं डोईजड नव्हता; ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे. परंतु त्याच्या

१. औरंगजेब चांगला शिकलेला असून, त्याचीं विद्वत्त्वदर्शक अशीं जीं कांहीं पत्रें, त्याचा गुरु मुल्ला साले यास गेलीं आहेत, त्यांत त्यानें उलट आपल्या गुरूलाच त्याच्या अज्ञानाबद्दल अतिशय हिणविलें आहे. व त्यांत, त्यानें (गुरूनें) आपल्याला निरुपयोगी व व्यर्थ श्रमाचें असेंच शिक्षण देऊन, मोठमोठ्या ऐतिहासिक, भूगोलसंबंधी व तत्वज्ञानाच्या गोष्टी समजावून सांगून, आपली बुद्धि अधिक ज्ञानसंपन्न करावयाची ती न करितां, तिचा दुरुपयोग केला; असें त्यास (गुरूला) लावून लिहिलें आहे! औरंगजेबानें एका पत्रांत आपल्या गुरूला असें लिहिलें आहे कीं:—

"तुह्मीं मला अनावश्यक अशी अरबी भाषा शिकविण्यांत फार दिवस घालवून, माझ्या कोंवळ्या "बुद्धीचा आणि तीक्ष्ण स्मृतिशक्तीचा दुरुपयोग केला. ज्या भाषेचा कधींही उपयोग व्हावयाचा "नाहीं ती भाषा राजपुत्रांना यावी ह्मणून दहा किंवा बारा वर्षे मला शिकवून त्यांत मला मोठा "वैयाकरणी अथवा धर्मशास्त्रज्ञ करण्याचा तुमचा विचार होता, तो किती हास्यास्पद होता बरें? "उपयुक्त विद्याकलांचें ज्ञान बालकांच्या बुद्धीप्रमाणें देण्याकडे त्यांच्या लहानपणचा काळ घाल"वावयाचा; त्या कालाचा आमच्या गुरुजींनीं असा दुर्व्यय करावा ना? आहा रे भूगोलज्ञाना! "मला पोर्च्युगल, हॉलंड किंवा इंग्लंड हे देश काय आहेत व कोठें आहेत हें कळूं नये? ते "देश ह्मणजे बेटें आहेत, का द्वीपकल्पें आहेत, अथवा सपाटीवर किंवा उंचवट्यावर आहेत, हें "मला समजूं नये? नुस्तें मला, चीन, इराण, काशगार, पेगू, तार्तरी वगैरे ठिकाणचे राजे हिंदु"स्थानच्या बादशहांचें नांव ऐकून थरथर कांपतात येवढें सांगितल्यानें व तें ऐकिल्यानें का " इतिहासाची माहिती झाली असें समजावयाचें? जगावर कसकशीं व कोणकोणचीं राज्यें आ"हेत; तेथील रीतीभाती, आचारविचार, राजकारकीर्दी, धर्म, वगैरेंच्या माहित्या; त्या त्या रा"ज्यांच्या भरभराटी किंवा आपत्ति; त्या भरभराटींत किंवा आपत्तींत कोणकोणत्या वेडेपणाच्या "चुकांनीं किंवा शहाणपणाच्या गोष्टींनीं फेरबदल झाले; आणि कोणत्या मोठमोठ्या गोष्टींनीं महान् "महान् राष्ट्रांमध्यें विलक्षण फेरफार होतात; इत्यादि गोष्टी इतिहासज्ञानाशिवाय कशा समजाव्या? "त्या मला तुह्मीं शिकविल्या काय? राजपुत्रांना असे अनेक महत्वाचे व विविध विषय शिकून "आपली बुद्धि प्रगल्भ व ज्ञानसंपन्न करावयाची असते, आणि त्यांच्या आयुष्यांतील ज्ञानसं"पादनाच्या कालापैकीं प्रत्येक क्षण मोठा किंमतवान् असतो हें समजून, तुह्मीं माझ्या कालाचा "आणि आयुष्याचा कोणता चांगला विनियोग केला? तुह्मीं मला, नाहींत त्या पोकळ व ध्यानांत "ठेवण्याला अत्यंत कष्टतर किंवा बुद्धीमध्यें घोंटाळा करून टाकणाऱ्या आणि मनुष्यदेहास किंवा "त्याच्या जगतीय वर्तनास केवळ निरुपयोगी, अशा प्रकारच्या परकीय भाषाज्ञानाच्या वगैरे गोष्टी "मात्र काय त्या शिकविण्यांत आपली कामगिरी बजावली, असें दाखविल्यासारखें नाहीं कां होत? "परभाषा शिकवून, तिच्या योगानेंच काय तीं शास्त्रें, धर्मविवेचन, न्यायनीति किंवा इतर आ"वश्यक ज्ञान शिकविण्याचा तुह्मांला सुलभ मार्ग होता काय? हें सर्व आवश्यक ज्ञान तुह्मांला "आपल्या जन्मभाषेंत मजला देतां आलें नसतें काय? तुह्मी माझा बाप, शाहजहान बादशाह, "याजवळ एकदां ह्मणालां होतां कीं, 'मी औरंगजेबाला तत्वज्ञानशास्त्र शिकवीन;' आणि मला "स्मरतें कीं, तुह्मीं मला पुष्कळ वर्षेंपर्यंत, आकाश, ब्रह्म, घटपट, इत्यादि नीरस शब्दांनीं

शौर्याचें आणि विद्वतेचें त्याच्या बादशाहीच्या संबंधानें राजकारणांत जसें चीज व्हावें

---

"कांहीं विषय समजून देण्याची खटपट करावी, व ती माझ्या मनांत उतरण्याकरितां मीं त्या वि-
"षयांत माझें डोकें गुंतवावें. पण मला माझ्या उपयुक्त ज्ञानवत्वास आणि माझ्या राज्यकर्तृत्वास
"हितप्रद असें ह्मणण्यासारखें मला त्या विषयापासून काय लभ्य झालें? तुह्मी जीं काय अव-
"जड व कष्टोच्चार्य नांवें घेत असां तेवढीं काय तीं तुमच्या संततोच्चारानें माझ्या ध्यानांत रा-
"हिलीं; परंतु त्यांच्या संबंधाचें विवेचन किंवा ती समजूत मी तेव्हांच विसरून जाई, हें तुह्मांस
"नव्हतें कां समजत? आणि तें विवेचन किंवा ती समजूत माझ्या ध्यानांत राहून तरी मला
"त्यांचा आज कितीसा उपयोग झाला असता? येणेंप्रमाणें तुह्मीं माझ्या कोंवळ्या बुद्धीचा
"आणि तीक्ष्ण स्मृतिशक्तीचा दुर्व्यय नाहीं का केला? असे भलभलते व तुमच्या मतानें महत्वाचे
"विषय मला समजून देण्यांत तुह्मीं इतका मात्र फायदा करून घेतला कीं, त्यांच्या योगानें आ-
"ह्मांसारख्या मूढ व अज्ञान्यांस, तुह्मी ह्मणजे सर्वज्ञ, सर्वशास्त्रपारंगत आणि अत्यंत पूज्य गुरु-
"वर्य आहांत असा निरर्थक भाव उत्पन्न करून, तुह्मांला आपलें आह्मांवरील वजन मात्र बरेच
"दिवस कायम ठेवितां आलें. तुमच्यामध्यें राजे लोकांची व्यर्थ स्तुति, हांजीहांजी आणि स-
"त्यापलाप हे गुण मात्र चांगले वसतात. तुह्मांला माझ्या दरबारांत मी एक उमराव करावें
"अशी जी तुमची इच्छा ती मीं तुमच्या कोणत्या गुणावर लुब्ध होऊन पूर्ण करावी? तुह्मी मला
"लष्करी, व्यावहारिक किंवा राजकीय शिक्षणांपैकीं कोणतें शिक्षण दिलें ह्मणून मी तुह्मांला मानूं?
"ह्या आवश्यक ज्ञानामध्यें जर तुह्मीं मला पारंगत केलें असतें तर मी तुमचा अत्यंत आभारी
"व ऋणी होऊन, ज्याप्रमाणें शिकंदर बादशाह महाविद्वान् आरिस्टॉटल् या आपल्या परम
"पूज्य गुरुवर्यावर निष्ठा व भाव ठेऊन त्याला मानीत होता, त्याप्रमाणें मीं तुह्मांस मानिलें अ-
"सतें. परंतु तशा प्रकारचें उपयुक्त शिक्षण आणि उपयुक्त विद्या तुह्मांकडून मला
"कांहींच मिळाल्या नाहींत; व येवढ्याकरितां तुमचेविषयीं, मजमध्यें सन्मान किंवा पूज्यभाव मु-
"ळींच उत्पन्न होत नाहीं. तुह्मी आलांत तसे चालते व्हा; आणि आपल्या गांवच्या गांवांत
"स्वस्थ देवाचें नांव घेत आयुष्याचे दिवस काढा. माझ्या दरबारांत तुह्मी प्रविष्ट होऊन, तुह्मी
"कोण हें देखील कोणास समजूं देऊं नये अशी माझी इच्छा आहे!"

औरंगजेबाला वरील पत्र लिहिण्याला मूळ कारण काय झालें हें त्यांतील शेवटच्या भागावरून कळून येण्यासारखें आहे. उपयुक्त ज्ञानाचें शिक्षण देण्याचा अभाव धरून, भलतेंच व निरुपयोगी घोंकीव शिक्षण देण्यापासून कांहीं एक फायदा नसून, मुलांकडून ते व्यर्थ श्रम करविल्यासारखें होतें, व त्याबद्दल मनुष्य जाणतें झालें ह्मणजे त्याजकडून औरंगजेबाप्रमाणेंच दोष मिळून त्या शिक्षकांचा व गुरूंचा निषेध व्हावयाचा! याचप्रमाणें औरंगजेबाच्या वरील लेखावरून हेंही ध्यानांत ठेवावयाचें कीं, मुलांचा परभाषा स्वाधीन करून घेण्यांत किती फुकट काळ जातो व त्यामुळें आवश्यक ज्ञान शिकण्यास किती विलंब होतो. परभाषा शिकण्यांतच कालव्यय करण्यापेक्षां त्या भाषांतलें ज्ञान स्वभाषेच्या योगानें मुलांस दिल्यास त्यांचा किती काळ वांचेल व तो दुसऱ्या उपयुक्त विषयाभ्यासाकडे आणि ज्ञानसंपादनाकडे लाविल्यास किती फायदा होईल? औरंगजेबाच्या वरील लेखाचें पर्यवसान आपल्या देशांतील हल्लींच्या स्थितीवर तर उत्तम प्रकारें करून

तसें झालें नाहीं. याचें कारण, त्याचा राज्याभिलाष, दुष्टपणा आणि पापबुद्धि हीं कांहीं अमर्याद होतीं. ह्याचप्रमाणें, जो मनुष्य दुष्ट, भ्रष्ट व कपटपटु असतो त्याचप्रमाणें तो दुसऱ्याविषयींही त्याच गुणांत साशंक असतो. औरंगजेब स्वतः जसा विश्वासघातकी आणि अप्रामाणिक असे, त्याचप्रमाणें दुसऱ्याच्या विश्वासावर व प्रामाणिकपणावर अवलंबून राहणारा तो मनुष्य नव्हता. यामुळें, त्याचा अधिकार व सत्ता यांची दिवसेंदिवस भरभराट होत जावयाची, परंतु तसें न होतां, उलट त्याचे सर्व निंद्य गुण त्याच्या नाशास कारण झाले. तो जसजसा अधिकारापन्न होत गेला तसतशी त्याची कपटबुद्धि अधिकाधिक वाढत चालली. त्याच्या अनिवार राज्यलोभतृष्णेनें जीं त्याजकडून अत्यंत घोर पातकें घडविलीं होतीं त्यांच्या योगानें आपल्या धर्माचे लोकांत आपली नाचक्की आणि बेअब्रू होऊं नये ह्मणून व मुसलमान लोकांस स्वपक्षाभिमानी राखावें ह्मणून, त्यानें हिंदु लोकांवर अत्यंत जुलूम चालवून, त्यांस एकसारखा बाटविण्याचा सपाटा चालविला. ह्याप्रमाणें एक अन्याय घालविण्याकरितां त्याचे जोडीला दुसरे अन्याय करण्यास तो प्रवृत्त झाला. परंतु त्या संबंधानें त्याला मुळींच कशी ती शंका वाटत नसे ! यामुळें इतकें मात्र झालें कीं, "त्याचे प्रांतांत सर्वत्र जमिनी पडून राहिल्या; आणि साळी, कोष्टी वगैरे कारागीर व उद्योगी लोकांचे धंदे बसल्यासारखे झाले. कोणाचाच जीव सुचित्त व बिनधोक नाहींसा झाला. मग अर्थात् औरंगजेबाला जमिनीचें उत्पन्न कमी येऊन त्याचे खजिन्यांत पैशाची तूट पडूं लागली. असें झालें तेव्हां त्यानें हिंदु लोकांवर जेजिया (डोईपट्टी) नांवाचा एक नवीनच कर बसवून, तो सक्तीनें

---

होण्यासारखें आहे. बुद्धिमान् मुलाला इंग्रजी भाषेचा चांगला परिचय होण्यास सात वर्षें तर लागतातच; तेव्हां मग त्या भाषेंतील अनेक ग्रंथावलोकनाचा अधिकार येतो; आणि ह्याप्रमाणें सात वर्षें केवळ परभाषेचा अभ्यास करण्यांत दवडावीं लागतात. तेवढ्या काळांत देशभाषेमध्यें अनेक विषय शिकून त्यांमध्यें अधीत होतां येईल. ज्या अर्थी आपल्या देशांत इंग्रजी राज्य आहे त्या अर्थी त्यांची भाषा ह्मणून शिकणें वावगें नाहीं. परंतु मनुष्याच्या ज्ञानतत्वाचें सर्व भांडार आणि साहित्य केवळ त्याच भाषेंत राखून ठेऊन ती भाषा शिकल्याशिवाय इतर नुसत्या देशभाषांतून तें विविधविषयज्ञान एतद्देशीय लोकांस मिळूं नये, व त्यासाठीं कोणींही देशहितचिंतकांनीं व अभिमान्यांनीं त्याबद्दलचा यत्न करूं नये, ही मोठी शोचनीय आणि लाजिरवाणी गोष्ट आहे ! परभाषाधीन सर्व ज्ञानप्राप्तीच्या वाटा असणें हेंच देशांतील मूर्तिमंत अज्ञान होय ! औरंगजेब बादशाहाचें वरील पत्र आपल्या देशांतील सद्यःस्थितीला तर अत्यंत अनुरूप आहे ! एतद्देशीय मुलांचा लहानपणाचा काळ असा परभाषाभ्यासाकडे विनाकारण जातो व त्याबद्दल त्यांनीं औरंगजेबाप्रमाणेंच आपल्या शिक्षकवर्गाचा प्रौढपणीं निषेध केल्यास तो कांहीं अवास्तव ह्मटला जाणार नाहीं !

वसूल करण्याचा सपाटा चालविला;" असें ऑर्मी नांवाचा एक मुसलमानइतिहासलेखक लिहितो. औरंगजेबाच्या या जुलमी आचरणानें हिंदु व मुसलमान यांजमधील वैर दिवसानुदिवस जास्त वाढत जाऊन, मुसलमानी बादशाहीविषयीं जिकडे तिकडे तिरस्कार व शाप ऐकूं येऊं लागले. मुसलमानधर्मस्थापक महंमद पैगंबर याचें धर्ममत ह्मणजे केवळ समशेर आणि कुराण हेंच असून, जगांतील सर्व लोकांस मुसलमान करण्याचाच काय तो उपदेश होता. मग त्याच्या पोटीं कोणतींही व कशींही भयंकर पातकें झालीं तरी मुसलमानी धर्माचा प्रसार करणें हेंच त्या भयंकर पातकांचें प्रायश्चित्त होतें. हेंच तत्व औरंगजेबानेंही मनांत धरून, राज्यलोभानें जरी पितृहत्त्या, भ्रातृहत्त्या व पुत्रहत्त्यादि महान् महान् पातकें त्याजकडून घडलीं होतीं, तरी त्या घोर पातकांचें प्रक्षालन किंवा प्रायश्चित्त ह्मटलें ह्मणजे ह्याप्रमाणें हिंदु लोकांस बाटविणें व आपल्या धर्माचा प्रसार करणें हेंच होतें असें तो समजत असे. कोण त्याचें हें धर्मवेड! पण इतक्या धर्मवेडांत जरी तो शिरला होता तरी त्याचे जीवास, त्यानें केलेल्या पितृभ्रातृहत्त्यादींचीं पातकें किंवा क्रूर कर्में, जणूं काय तोडून तोडून खात होतीं! कारण, त्याचे चित्ताला कशीं तीं शांति आणि सुख हीं नाहींशीं झालीं. त्याच्या कानांत जसे काय, त्याच्या पापकर्मांबद्दल त्याला सतत स्मरण देण्याकरितां रात्रंदिवस बाप, भाऊ, मुलगा, अशा शब्दांचे घंटानाद घणघणाट करून राहिले होते, असें शेवटीं त्याला वाटूं लागलें! आपल्या अमदानींत आपण जीं महान् महान् घोर पातकें केलीं त्यांचें त्याला, तो मृत्युशय्येवर पडला असतां मूर्तिमंत दर्शन होऊन, तो अत्यंत विव्हल होई. त्या तशा अवस्थेंत त्यानें आपल्या पुत्रास व नातवास जीं पत्रें लिहिलीं आहेत. त्यांत तो ह्मणतो कीं, "मीं कोणत्याही दिशेकडे बघितलें तरी मला सर्वत्र देवदूत दिसत आहेत; व ते सौम्य व शांत वृत्तींत असलेले दिसत नसून, जणूं काय मीं त्यांचा फार मोठा अपराध केल्यामुळें ते क्रोधदृष्टीनें आणि भयंकर मुद्रेनें मजकडे पहात आहेत!"

---

१. औरंगजेब हा दुष्ट बुद्धीचा होता; तरी त्याची विद्वत्ता व बुद्धि, हीं फार तीक्ष्ण होतीं, हें पूर्वी दिलेल्या त्याच्या पत्राच्या गोषवाऱ्यावरून कळेलच. त्याचप्रमाणें, तो मरणोन्मुख होऊन आसन्नावस्थेंत असतांना, त्यानें आपल्या मुलाला व नातवाला जीं पत्रें लिहिलीं ह्मणून वर ह्मटलें आहे तीं पत्रेंही याखालीं दिल्यास अप्रासंगिक होणार नाहींत. औरंगजेबाच्या विद्वत्तेची आणि बुद्धिमत्ताची त्याच्या प्रबल महत्वाकांक्षेपुढें आणि राज्यलोभापुढें केवल मृत्तिका झाली! तो आपल्या मरणकाळच्या यातनांविषयीं पश्चात्तापपूर्वक आपल्या पत्रांत काय लिहितो तें बघा:—

(१)"चिरंजीव शाह अजीमशाह यास—आशीर्वाद. माझें अंत:करण तुजकडे आहे. मला तर वृद्धा-
"वस्था प्राप्त होऊन, अशक्ततेनें अगदीं ग्रस्त केलें आहे. माझ्या सर्व अवयवांतली एकंदर शक्ति नष्ट झाली.
"मी या जगांत जसा एकटाच व परस्थ ह्मणून आलों तसा एकटाच व परस्थ ह्मणून जाणार! मी कोण

राणा राजसिंग हा उदेपूरच्या गादीवर बसल्यानंतर त्यानें लागलेंच औरंगजेबा-

"व कशाकरितां जन्मलों, आणि माझ्या प्रारब्धीं काय लिहून ठेवलें होतें, हें मला कांहींच माहीत "नाहीं! जो क्षण सुखांत गेला त्यानें आपल्या पश्चात् दुःख मात्र राखून ठेवलें! मी माझ्या रा- "ज्याचा संरक्षकही झालों नाहीं आणि पालकही झालों नाहीं. माझें बहुमोल आयुष्य व्यर्थ गेलें. "मला जसजशी बुद्धि होई तसतसें मी करीत गेलों. माझ्या अंतःकरणास सदसद्बुद्धीनें जशी जशी "प्रेरणा करावी तसा तसा मी वर्तें. माझेमध्यें सदसद्विचारशक्ति नसे असें नाहीं. परंतु तिचा "कडक प्रकाश माझ्या धुंद दृष्टीनें मला दिसला नाहीं. आयुष्याची शाश्वति नाहीं हें माझ्या मनांत "मीं बागविलें नाहीं. गेलेली श्वास परत येत नाहीं; आणि यामुळें पुढें माझ्या शाश्वत कल्याणाची "आशा नाहीं! माझे शरीरांत जो ज्वर असे तो निघाला आहे; व आतां तरी पुढें माझ्या अस्थि "आणि चर्म हींच काय तीं अवशिष्ट रहावयाचीं आहेत. प्रिय पुत्र कामबक्ष हा जरी विजापुराकडे "गेला आहे तरी तो माझेजवळच आहे. आणि, माझे पुत्रा! तूं तर त्याच्याहून अगदींच जवळ "आहेस. परंतु प्रिय शाहअलम मात्र फार दूर आहे. माझा प्रिय नातू (अजीम उश्शान) हा ईश्वरी "कृपेनें हिंदुस्तानाजवळ येऊन पोंचला आहे. आपली फौजफांटा आणि बाजारबुणगें हीं आतां माझ्या- "प्रमाणेंच त्रासून निराधार आणि निःशस्त्र झाल्यासारखीं होतील व त्यांच्याही जीवास माझ्याप्रमा- "णेंच शांति व समाधान यांचा अभाव होऊन, त्यांच्या जीविताची जलबुद्बुदवत् किंवा आरशाचे मा- "गच्या कल्हईसारखी शाश्वति नाहीं, हें सिद्धच आहे. त्यांचा राजा (मी) नाहींसा झाल्यावर त्यांना "कोणी धनी किंवा पोशिंदा मिळेल किंवा नाहीं हें त्या बिचाऱ्यांस मुळींच माहित नाहीं! मीं या "जगावर कांहीं एक बरोबर आणिलें नाहीं; आणि, आतां या जगावरून जातांना मनुष्याचे ठायीं "असणारी प्रत्येक गोष्टीची अशाश्वति आणि अनियमितता हीं मात्र मी बरोबर नेत आहें. मला मुक्ति "कशी मिळेल याची मला अत्यंत भीति वाटत आहे; आणि ईश्वराचे संनिध मला कोणकोणत्या दुःसह "शिक्षा व यातना भोगाव्या लागतील त्या कोणास माहीत? ईश्वर हा कृपाळु आणि दयानिधि आहे "हें मला पूर्णपणें माहित आहे व त्यावर माझा दृढतर विश्वास आहे; परंतु मजकडून जीं अघोर "व अक्षम्य पातकें व कृत्यें घडलीं आहेत त्यांबद्दल त्या कृपाळु दयासागर परमात्म्यानें मजवर "आपली प्रेमल दृष्टि कशी ठेवावी, हें मला समजत नाहीं; आणि यामुळें माझें चित्त भीति- "ग्रस्त झालें आहे! माझें प्राणोत्क्रमण झाल्यावर माझे पश्चात् माझें प्रतिबिंब म्हणून कांहीं एक "राहणार नाहीं! असो; मी आपलें शरीररूप तारूं मृत्यूच्या अगाध समुद्रांत ढकललें आहे "खरें; तें आतां कोणत्याही प्रकारच्या यातना, विपत्ति किंवा भीति त्यांच्या उंच लहरींवर जावो, "चढो, आणि कोठेंही आदळो, वा पडो. ईश्वर माझे पश्चात् माझे मुलांस विजय व वैभव दे- "ण्यास समर्थ आहे. तथापि, त्यांनीं आपलें आवश्यक कर्तव्य तें केलें पाहिजे. माझा प्रिय "नातू (बेदरबख्त) याचेवर ईश्वराची कृपा असावी म्हणून मी प्रार्थना करितों. बेदरबख्त "याची माझी आतां भेट होणार नाहीं; परंतु त्याला भेटावें अशी मला इच्छा होत आहे. "माझी प्रिय कन्या बेगम ही फार त्रस्त झाल्यासारखी झाली आहे; परंतु ईश्वर हाच सर्वांच्या "हृदयांत काय आहे याचा न्याय करण्यास समर्थ आहे. स्त्रियांचे भलभलते व मूर्खपणाचे वि- "चार त्यांच्या निराशेशिवाय त्यांना दुसरें कांहीं प्राप्त होऊं देत नाहींत. हेंच माझें काय तें "शेवटचें म्हणणें. आतां येतों! येतों!! येतों!!!"—